# पुणे जिल्हा : भाग १

संकलन : माधुरी नाईक, मंचर

Madhuri. jadhav26@yahoo. co. in

9820234891

8369371412



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : २६ मार्च २०१७

आज आपण पुणे जिल्ह्याची सफर करणार आहोत. पुणे तिथे काय उणे हे आपण नेहमी ऎकतो. खरंच! त्याप्रमाणे सर्व प्रकारच्या फिरण्यासाठी पुण्यात स्थळे आहेत. आपल्या सोयीसाठी तालुक्याप्रमाणे त्याचे विभागीकरण केले आहे. मी मला जमेल तसे यात वर्णन केले आहे. काही नविन स्थळांची माहिती पुणेरी भटक्या मित्रांनी दिली आहे. काही इंटरनेट वरुन तसेच काही वर्तमानपत्रामधे मिळालेली माहिती एकत्र केली आहे माझ्या पुढच्या भटकंतीसाठी. आणि हल्ली सर्व जण कुठे ना कुठे जात असतातच. गेले की तिथले फोटो काढून ते आपल्या मोबाईलवर डिसप्ले फोटो ठेवतच असतात. मग काय आपोआप डिसप्ले फोटो छान आहे. कुठे गेलेले असे विचारले की मिळाली थोडी नवी माहिती, नवे स्थळ. वाचक ही त्यांच्या जवळची अशी स्थळे नक्की कळवतील अशी आशा करते. प्रत्येक गावात एक मंदिर तर असतेच. असेल तर एखादी नदी काही ऎतिहासिक वारसा असेल तर तेवढेच कळवा. काही स्थळे फार अगोदर बघितली असल्याने कसे गेलो होतो हे देखिल आठवत नाहिये. पण ते तुम्ही तर नक्कीच शोधाल. त्यात पण एक मजा असते. रस्त्यांच्या बाबतीत माझा फार गोंधळ असतो. पण भटक्यांना काय ठिकाणाचे नाव कळाले तरी पुरे असते. पुढचे शोधण्याचे काम ते बरोबर करतात. तुम्हाला काही अजून माहित असल्यास नक्की कळवा.

शिवरायांनी याच पुण्यात बालपणी संस्कारांचे व पराक्रमी धडे गिरविले. पेशवाईमध्ये याच पुण्याने राजधानीचे स्थान भूषविले. पेशव्यांचे कर्तृत्वही फुलविले याच पुण्याने. असे हे पुणे ! लोकमान्य टिळकांची

ही कर्मभूमी. थोर समाजसुधारक जोतिबा फुल्यांच्या समाजपरिवर्तनाच्या कार्यास सुरुवातही येथूनच झाली. या कार्याला प्रेरणाही या पुण्यातच मिळाली आणि.... विरोधही येथेच झाला.

समाजपरिवर्तन, सुधारणेच्या कार्यात सर्वस्व झोकून देणाऱ्या अनेक समाजसुधारकांचे कर्तृत्व याच पुण्याने फुलविले. गोपाळ हरी देशमुख (लोकहितवादी), महात्मा जोतिबा फुले, यांसारखे समाजसुधारक ही पुण्याच्या मातीने राष्ट्राला दिलेली देणगीच ठरली. रा. गो. भांडारकर, सुधाकर आगरकर, लोकमान्य टिळक, गोपाल कृष्ण गोखले, महर्षी धोंडो केशव कर्वे यांसारख्या नररत्नांचे कार्यक्षेत्र ही हे पुणेच.

पुणे शहराच्या नावावरून जिल्ह्यासही पुणे जिल्हा असे नाव पडले. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात होऊन गेलेल्या टॉलेमी याच्या लिखाणात पुण्याचा ‘पुन्नाटा’ असा उल्लेख आढळतो. राष्ट्रकूट राजवटीत या गावाचा ‘पुनवडी’ नावाने उल्लेख केला जाई. पुण्य या शब्दावरून पुणे हे नाव पडले असावे, अशीही एक उपपत्ती मांडली जाते. मुळा व मुठा या नद्यांच्या संगमावर वसलेले पुण्यस्थळ म्हणून हे नाव पडले असावे. मोगल राजवटीत या गावाचा ‘कसबे पुणे’ असा उल्लेख आढळतो.

आंध्र, चालुक्य व राष्ट्रकुटांच्या प्राचीन राजवटी पुण्याने पाहिल्या. मध्य युगातील यादवांचा अमलही पुण्याने पाहिला. बहामनी, निजामशाही व आदिलशाही राजवटीही येथेच त्यांच्या मनात रुजले. मराठा राजवटीत पुणे हे एक महत्त्वाचे राजकीय केंद्र होते. पुढील काळात पेशव्यांनी आपली राजधानी येथे वसविली. १८१८ साली मराठेशाहीचा अस्त झाला व पुण्याच्या शनिवारवाड्यावरील भगव्या झेंड्याची जागा ‘युनियन जॅक’ने घेतली. स्वांतत्र्य आंदोलनातही पुणे अग्रभागी राहिले. आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडक्यांची कर्मभूमीही पुणे हीच होती. पुण्याच्या गणेशखिंडीतच २२ जून १८९७ रोजी चापेकर बंधूनी रँड या जुलमी प्लेग कमिशनरचा वध केला. अनेक क्रांतिकारकांनी व स्वतंत्र्य सेनानींनी पुण्यास आपली कर्मभूमी मानले होते. १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला आणि पुण्याच्या शनिवारवाड्यावरील ‘युनियन जॅक’ची जागा भारताच्या ‘तिरंगी झेंड्याने’ घेतली.

पुणे शहर भारताच्या इतर महत्त्वाच्या शहरांशी रस्ता, रेल्वे व हवाईमार्गाने चांगल्या प्रकारे जोडले गेले आहे. पुणे विमानतळावरुन पूर्वी फक्त देशांतर्गत वाहतूक चालत असे पण आता सिंगापूर व दुबईला जाणाऱ्या उड्डाणांमुळे, विमानतळ आंतरराष्ट्रीय झाला आहे.

नवा ग्रीनफिल्ड पुणे आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रकल्प महाराष्ट्र सरकार सुरू करणार असून तो चाकण व राजगुरुनगर या गावांमधील चांदूस व शिरोळी यांच्या जवळ (पुण्यापासून ४० कि. मी. अंतरावर) होण्याची शक्यता आहे. या प्रकल्पाची जबाबदारी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे सोपवली गेली आहे.

पुणे जिल्ह्यातील तालुके : एकूण तालुके चौदा.

१. पुणे शहर

२. हवेली ६४

३. खेड ७५

४. आंबेगाव ८१

५. जुन्नर 74

६. शिरूर १०८

७. दौंड १२२

८. इंदापूर १२४

९. बारामती १२८

१०. पुरंदर १४१

११. भोर १५६

१२. वेल्हे १६०

१३. मुळशी १६२

१४. मावळ १५४

**पुणे जिल्ह्यातील महत्त्वाची स्थळे :** महाराष्ट्राचे अष्टविनायक हे सर्व पुणे जिल्ह्यात नसले तरी पाच गणपती हे पुण्यात येतात. अष्टविनायक यात्रा ही सर्वत्र प्रसिद्ध आहे. तर चला सर्व प्रथम श्री गणरायाची अष्टविनायक सफर करुया.

## अष्टविनायक :

श्री गणपतीची महाराष्ट्रातील प्रत्येक गावात एक-दोन मंदिरे हमखास पाहण्यास मिळतात. त्या मंदिरांतून श्री गणेशाची हजारो रूपे भाविक अनुभवतात. महाराष्ट्रातील ‘आठ’ ठिकाणच्या श्रीगणेश मंदिरांना, मुर्तींना विशेष महत्त्व आहे. या आठ ठिकाणच्या श्री गणपतीच्या मंदिरांस मिळुन ‘अष्टविनायक’ म्हटले जाते. गणपतीच्या अनेक नावांपैकी एक नाव म्हणजे विनायक; म्हणुनच या मंदिरांचा संच म्हणजे अष्टविनायक! अष्टविनायकांची मंदिरे (स्थळे) महाराष्ट्रातच नव्हे, तर संपूर्ण भारतात प्रसिद्ध आहेत. गणपती ही विद्येची देवता असुन तो, सुखकर्ता, दु:खहर्ता आणि रक्षणकर्ता आहे अशी गणेश भक्तांची भावना आहे.

श्री गणेशाच्या अनेक प्रतिमा (मूर्ती) तयार केल्या गेल्या परंतु दगडावर नक्षीकाम करून निर्माण केलेल्या प्राचीन मुर्तींचा शोध ज्या ठिकाणी लागला, तसेच जेथे ‘स्वयंभू’ प्राचीनतम मूर्ती सापडल्या अशा स्थळांना विशेष महत्त्व प्राप्त झाले. याच मंदिरांना अष्टविनायकांची मंदिरे समजले जाते. महाराष्ट्रातील असंख्य भाविक अष्टविनायकाची यात्रा करतात. अष्टविनायकाची सर्व मंदिरे ही अंतराच्या दृष्टीने परस्परांच्या जवळ आहेत. साधारणपणे दीड ते दोन दिवसांत ही अष्टविनायक यात्रा पुर्ण होऊ शकते. पुणे जिल्ह्यात पाच (मोरगाव, थेऊर, रांजणगाव, ओझर, लेण्याद्री), रायगड जिल्ह्यात दोन (महड, पाली) व अहमदनगर जिल्ह्यात एक (सिद्धटेक) या ठिकाणी ‘अष्टविनायक स्थाने’ आहेत. त्यांची सविस्तर माहिती पुढीलप्रमाणे -

## १. मोरगांव –

अष्टविनायकांपैकी पहिला गणपती हा मोरगावचा मोरेश्वर. या गणपतीस श्री मयुरेश्वर असेही म्हणतात. थोर गणेशभक्त मोरया गोसावी यांनी येथील पुजेचा वसा घेतला होता. श्री मोरेश्वर गणेशाचे, हे स्वयंभू व आद्यस्थान आहे. प्रत्येक घरात म्हटली जाणारी ' सुखकर्ता दु:खहर्ता' ही आरती श्री समर्थ रामदास स्वामींना याच मंदिरात स्फुरली, असे म्हटले जाते.

जवळच कऱ्हा ही नदी आहे. मंदिरावर अनेक प्रकारचे नक्षीकाम केलेले आहे. श्री मोरेश्वराच्या डोळ्यात व बेंबीत हिरे बसवलेले आहेत. या मंदिराच्या भोवती बुरूजसदृश दगडी बांधकाम प्राचीन काळापासून आहे. मंदिरामध्ये नग्नभैरव, शमीविघ्नेश, मंदारगणेश, दुर्वादेवी, अष्टविनायक, द्वार देवता, भृशुंडीमहाराज, शूर, महाशूर, शुक्लचतुर्थी, कृष्णचतुर्थी, खंडोबा, रेणुकामाता, गवराईमाता, हनुमंत, साक्षविनायक, अन्नपूर्णाचिंतामणी, मोरया गोसावी, कल्पवृक्ष विनायक, नवग्रह, गणेश योगीन्द्र, विद्याहर मयुरादेवी, बल्लाळविनायक, श्रीगुरुदत्त, नागदेवता, मोद प्रमोद, नंदिकेश्वर, महामूषक या देवता आहेत पुणे जिल्ह्यातील बारामती तालुक्यात मोरगांव हे ठिकाण आहे. मोरगाव हे पुण्यापासून सुमारे ७० कि. मी. अंतरावर आहे. तर बारामतीपासून ३५ कि. मी. अंतरावर आहे. महाराष्ट्राचे कुलदैवत जेजुरीचा खंडोबा हा मोरगावपासून अगदी १७ कि. मी. अंतरावर आहे. या तीनही ठिकाणांपासून मोरगांवला जाण्यासाठी सार्वजनिक वाहतुकीची सोय आहे.



## २. थेऊर –

अष्टविनायकांपैकी थेऊरचा श्री चिंतामणी हा दुसरा गणपती आहे. थेऊरच्या कदंब वृक्षाखाली हे श्री गणेशाचे ठिकाण आहे. भक्तांच्या चिंतेचे हरण करणारा म्हणून याला चिंतामणी म्हणतात. या गणेशाला डाव्या बाजुला सोंड आहे.

पुण्यातील पेशव्यांच्या घरातील अनेक जण थेऊरला सतत येत असत. पेशवे घराणे खूप मोठे गणेशभक्त होते. थेऊरचा विस्तार हा माधवराव पेशवे यांनी केला. माधवराव पेशव्यांचे निधन थेऊरलाच झाले. यांच्याबरोबर सती गेलेल्या रमाबाई यांची समाधीदेखील या ठिकाणी आहे. मंदिराच्या आवारात निरगुडकर फाउंडेशन निर्मित थोरल्या माधवरावांची स्फूर्तिदायक कारकिर्द दाखवणारे कलात्मक दालन आहे.

थेऊर पुणे-सोलापूर महामार्गाला जोडलेल्या रस्त्यावर, हवेली तालुक्यात असून पुण्यापासून हे ३० कि. मी. अंतरावर आहे. पुण्यापासून बसेसची सोय आहे. चिंतामणी मंदिर परिसरात शंकराचे, विष्णू-लक्ष्मीचे व दक्षिणमुखी मारूतीचे मंदिर आहे. ग्राम देवता असलेल्या महातारी आईचे मंदिर उत्तरेकडे एक कि. मी. अंतरावर आहे. त्याच्या जवळ सिद्धेश्वराचे (शंकराचे) मंदिर असून जवळच महासाधू श्री मोरया गोसावी यांनी केलेल्या तपश्चर्येचे स्थान आहे. तसेच श्रीमंत थोरले माधवराव पेशवे यांचे निर्वाण स्थान चिंतामणी मंदिर परिसरात आहे. यशवंत सहकारी साखर कारखान्याच्या मागील बाजूस श्रीचिंतामणीचे माता पिता 'माधव व सुमेधा' देवी यांची मंदिरे आहेत. त्याच्या जवळच खडकेश्वर हे शंकराचे मंदिर आहे. त्याच परिसरात कालिका मंदिर व भैरवनाथाचे मंदिर आहे. पश्चिमेकडे नदीच्या काठावर रमाबाईसाहेब या आपले पती श्रीमंत थोरले माधवराव पेशवे यंच्या सह सती गेल्या, त्यांचे स्मारक आहे. रमाबाई पेशवे स्मारकाचे चिंचवड देवस्थानाने जीर्णोद्धार केलेला आहे. चिंतामणी मंदिराच्या नैऋत्य दिशेला कौण्डिन्य ऋषिंचा आश्रम असलेले स्थान अंदाजे १ कि. मी. अंतरावर आहे.

थेऊर गावाला तीनही बाजूंनी मुळामुठा नदीचा वेढा आहे. तेथे नदीला बाराही महीने पाणी असते. नदीच्या डोहाला 'कदंबतीर्थ' किंवा 'चिंतामणितीर्थ' असे म्हणतात.



## ३. सिद्धटेक –

सिद्धटेकचा श्री सिद्धिविनायक हा अष्टविनायकांपैकी तिसरा गणपती. हे भीमा नदीवर वसलेले सिद्धिविनायकाचे स्वयंभू स्थान आहे. याचा गाभारा लांबी-रुंदीने भरपूर मोठा आहे. तसेच मंडपही मोठा-प्रशस्त आहे. पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांनी जिर्णोद्धार करून मंदिर बांधले आहे. मंदिरात पितळी मखर असून त्याभोवती चंद्र-सूर्य-गरूड यांच्या प्रतिमा आहेत. श्रीसिद्धिविनायकाची मूर्ती टेकडीमध्ये स्थापलेली असल्याने सिद्धटेक मंदिरास एक किलोमीटरचा प्रदक्षिणा मार्ग आहे. या प्रदक्षिणामार्गात शंकर, शिवाईमाता, विष्णू ही मंदिरे व ग्राम दैवत येतात. मंदिराच्या बाहेर श्रीमारुती मंदिर आहे. मंदिराच्या पश्चिमेस शंकराचे व शिवाई देवीचे मंदिर आहे. या मंदिराजवळून भीमा नदी वहाते. ती या ठिकाणी दक्षिणवाहिनी झाली आहे. त्यामुळे येथे भीमेचे स्नान माहात्म्य मोठे आहे. जवळच काळभैरवाचे स्थान आहे. हा येथील राखणदार समजला जातो.

चतुर्थीच्या दिवशी दिवसभर थांबलेल्या भाविकांना देवांची तीन रुपे बघण्यास मिळतात.

अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यात हे ठिकाण असून दौंडपासून ९९ कि. मी. अंतरावर आहे. तर राशिनपासून १४२ कि. मी. अंतरावर आहे.



## ४. रांजणगाव –

अष्टविनायकापैकी हा चौथा गणपती. या गणपतीला महागणपती असे म्हणतात. हे महागणपतीचे स्वयंभू स्थान आहे. पुणे-नगर मार्गावर शिरूर तालुक्यात हे ठिकाण आहे.

या स्थानासंदर्भात एक दंतकथा आहे ती अशी की - त्रिपुरासूर या दैत्यास शिवशंकरांनी काही शक्ती प्रदान केल्या होत्या. या शक्तीचा दुरूपयोग करून त्रिपुरासूर स्वर्गलोक व पृथ्वीलोक येथील लोकांना त्रास देऊ लागला. शेवटी एक वेळ अशी आली की, शिवशंकराला श्री गणेशाचे नमन करून त्रिपुरासुराचा वध करावा लागला. म्हणून या गणेशाला 'त्रिपुरारीवदे महागणपती' असेही म्हटले जाते.

अष्टविनायकांपैकी सर्वाधिक शक्तिमान असे महागणपतीचे रूप आहे. श्री महागणपती उजव्या सोंडेचा असून गणेशाला कमळाचे आसन आहे. माधवराव पेशव्यांच्या काळात या मंदिराचा जिर्णोद्धार केल्याचे इतिहासात आढळते. इंदूरचे सरदार किबे यांनीदेखील या मंदिराचे नूतनीकरण केल्याचा उल्लेख आढळतो.

हे श्री महागणपतीचे स्थान इ. स. १० व्या शतकातील आहे. श्री गणेशाला दहा हात आहेत आणि प्रसन्न व मनमोहक अशी श्रींची मूर्ती आहे.



## ५. ओझर-

अष्टविनायकांपैकी ओझरच्या विघ्नेश्वर हा पाचवा गणपती आहे. येथील श्रींची मूर्ती लांब रूंद असून अष्टविनायकापैकी सर्वात श्रीमंत गणपती म्हणून श्री विघ्नेश्वराला ओळखले जाते. श्रींच्या डोळयात माणिक असून, कपाळावर हिरा आहे. अशी प्रसन्न व मंगल मूर्ती असलेला श्रीगणेश विघ्नांचे हरण करतो, म्हणून या गणपतीला विघ्नेश्वर म्हणतात. ही गणेशाची स्वयंभू मूर्ती आहे.

मंदिराच्या चारही बाजूंना तटबंदी-बांधकाम असून, मध्यभागी गणेशाचे मंदिर आहे. कुकडी नदीच्या तीरावर असलेले हे मंदिर एक जागृत स्थान आहे. थोरल्या बाजीराव पेशव्यांचे बंधू चिमाजी अप्पा यांनी या मंदिराचा जिर्णोद्धार केल्याचा उल्लेख इतिहासात आढळतो.

मंदिराच्या परिसरात भाविकांना राहण्यासाठी धर्मशाळेची उत्तम व्यवस्था आहे. जुन्नर तालुक्यातील हे स्थान लेण्याद्रीपासून १४ कि. मी. वर तर पुण्यापासून ८५ कि. मी. अंतरावर आहे. येथून जवळच आर्वी उपग्रह केंद्र व खोडद येथील आशिया खंडातील सर्वात मोठी दुर्बिण आहे. छत्रपती शिवाजी महाराजांचे जन्मस्थान असलेला शिवनेरी किल्ला हादेखील जवळच आहे.



# ६. लेण्याद्री –

अष्टविनायकापैकी सहावा गणपती लेण्याद्रीचा श्री गिरिजात्मक. जुन्नर तालुक्यातील जुन्नर लेण्यांच्या समुदायात आणि कुकडी नदीच्या परिसरात डोंगरावर श्री गिरिजात्मक गणेशाचे हे स्वयंभू स्थान आहे. श्री गणेशाची प्रसन्न मूर्ती असून ती दगडामध्ये कोरलेली आहे. मंदिर परिसरातील खडकामध्ये कोरीवकाम, खोदकाम केलेले आहे. पेशवे काळात या मंदिराचा जिर्णोद्धार झाला होता. मंदिरात दगडी खांब आहेत व त्यावर वाघ, सिंह, हत्ती असे सुंदर नक्षीकाम केलेले आहे. मंदिरात जाण्यासाठी डोंगरावर सुमारे ४०० पायऱ्या आहेत.

लेण्याद्रीचा श्री गिरिजात्मक हा जुन्नरपासून ७ कि. मी. अंतरावर आहे, तर पुण्यापासून सुमारे ९७ कि. मी. अंतरावर हे ठिकाण आहे.



## ७. महड –

महडचा वरदविनायक हा अष्टविनायकांपैकी सातवा गणपती आहे. हे स्वयंभू स्थान असून त्याला मठ असेही म्हणतात. श्री वरदविनायकाचे मंदिर साधे, कौलारू असून मंदिराला घुमट आहे व त्याला सोनेरी कळस आहे. कळसावर नागाची नक्षी आहे.

या मंदिरासंदर्भात एक कथा प्रसिद्ध आहे. एका भक्ताला स्वप्नात देवळाच्या मागील तळयात पाण्यात पडलेली मूर्ती दिसली. त्याप्रमाणे त्या व्यक्तीने शोध घेतला व मूर्ती मिळाली. तीच या मंदिरातील प्रतिष्ठापना केलेली मूर्ती होय. मंदिरात दगडी महिरप असून गणेशाची मूर्ती सिंहासनारूढ आहे व उजव्या सोंडेची आहे. इ. स. १७२५ मध्ये पेशवे काळात हे मंदिर बांधले गेले.

रायगड जिल्ह्यातील महड हे पुणे - मुंबई राष्ट्रीय महामार्गावर खोपोली - खालापूरच्या दरम्यान आहे.



## ८. पाली –

पालीचा गणपती हा अष्टविनायकांपैकी आठवा गणपती आहे. या गणपतीला श्री बल्लाळेश्वर म्हणतात. बल्लाळेश्वर गणपतीचे हे स्वयंभू स्थान आहे. मंदिर पूर्वाभिमुख असून गणपतीची सोंड डाव्या बाजूला आहे. गणेशाचे कपाळ विशाल असून डोळ्यात हिरे आहेत. मंदिर चिरेबंदी आहे. मंदिरात प्रचंड घंटा असून ती चिमाजी अप्पांनी अर्पण केली आहे.




हे स्थान रायगड जिल्ह्यातील सुधागड तालुक्यात असून, सुधागड या भव्य किल्ल्याची पार्श्वभूमी व अंबा नदीच्या निसर्गरम्य सान्निध्यात बल्लाळेश्वराचे मंदिर वसले आहे. पालीपासून जवळच उन्हेरचे गरम पाण्याचे झरे व सरसगड हा प्राचीन किल्ला आहे.

देवालयातून दिसणारा सरसगड हा शिवाजी कालीन टेहेळणीचा किल्ला आहे, किल्ल्यावर टेहेळणीचे बुरूज व प्राचिन शिवमंदिर पहाता येते. पालीपासून ४ किलोमीटर अतंरावर भूगर्भातून भुपृष्ठावर वहाणारे गंधयुक्त गरम पाण्याचे झरे **उन्हेरे** येथे पहावयास मिळतात. तेथेच पाली गावाला पाणीपुरवठा करणारे ``उन्हेरे धरण" हा मातीचा बंधारा आहे. येथून जवळच केशवनगर येथे ``श्री रुद्रेश्वर शिवमंदिर" आहे. येथे महाशिवरात्रीला मोठा उत्सव साजरा केला जातो. श्रावणी सोमवारी `बर्फाची वाडी'  भरली जाते.

भोर संस्थानिकांची कुलदेवता श्री **भोराई देवी** १५ किमी. अंतरावर आहे देवीची स्थापना भृगू ऋषींनी केली आहे. नवरात्रामध्ये १० दिवस गडावर मोठय़ा प्रमाणात उत्सव साजरा होतो. देवीची स्थान जागृत आहे. ह्या किल्ल्याला ``सुधागड" असे म्हणतात.

गोमाशी येथील डोंगरात ``भृगुऋषी" स्थान असून नाडसूर जवळच ``ठाणाळे" येथे सुंदर कोरीव लेणी आहेत.

श्री रामास ज्या ठिकाणी देवीपासून वर प्राप्त झाला ते ठिकाण उसर येथे आहे. त्या देवीस ``वरदायिनी" असे संबोधतात. हे निर्सगरम्य स्थान पालीपासून ९ कि. मी. अंतरावर आहे. ही पालीची ग्रामदेवता आहे. येथेही नवरात्रात दहा दिवस देवीचा उत्सव साजरा केला जातो. रावणाने जटायुशी युद्ध करून ज्या ठिकाणी जटायुचे पंख छाटले व श्री रामांनी ज्या ठिकाणी जटायुचा उद्धार केला ते ``उद्धर" स्थान व तेथून वर रामेश्वर येथे श्री शंकराचे स्वयंभू स्थान पाली येथून १४ कि. मी. अंतरावर आहे. उद्धर येथे अस्थी विसर्जनाचे कुंड आहे. येथे अस्थी पाण्यात विरघळतात. येथूनच जवळ ``रामेश्वर वैभव" हे थंड हवेचे ठिकाण आहे.

पालीपासून ३ कि. मी. अंतरावर सिद्धेश्वर येथे ३५० वर्षापूर्वीचे पाषाणी स्वयंभू शंकराचे स्थान आहे. येथे (कार्तिक शु. पोर्णिमा) त्रिपुरारी पोर्णिमेला मोठा उत्सव साजरा केला जातो.

सिद्धेश्वरजवळ पुई येथे ``एकविस गणपतीचे" सुंदर मंदिर पहावयास मिळते.

पालीपासून अंदाजे १७ किलोमीटर अंतरावर आसरा नवघर येथे श्री विरेश्वराचे स्वयंभू स्थान आहे.

पाली शहरात मल्लिकार्जुन, हटाळेश्वर, केदारेश्वर ही शिवमंदिरे तसेच पूर्वाभिमुख मारूती मंदिर, दत्त मंदिर, श्रीराम मंदिर, अंबामाता मंदिर, लक्ष्मीनारायण मंदिर, महाकाली मंदिर, मरिमाता मंदिर ही अन्य मंदिरे आहेत. पाली खोपोलीपासून ३८ कि. मी. अंतरावर आहे तर पुण्यापासून १११ कि. मी. अंतरावर आहे. खोपोली - पेण रस्त्यावर पालीस जाण्यास रस्ता फुटतो, तर पनवेल - गोवा या राष्ट्रीय महामार्गावर वाकणपासून पालीस रस्ता जातो.

भाद्रपद महिन्यातील चतुर्थीला या आठही ठिकाणी यात्रा भरते. सर्व जाती-धर्माचे लोक या ठिकाणी येऊन श्रद्धापूर्वक दर्शन घेतात. भाद्रपद शुद्ध चतुर्थी ते अनंत चतुर्दशी या काळात श्री गणेशाचा उत्सव सर्वत्र साजरा केला जातो.

अष्टविनायकाच्या आठही ठिकाणी भोजनाची व निवासाची उत्तम व्यवस्था आहे. अष्टविनायक दर्शनासाठी पुणे, अहमदनगर, रायगड या तीन जिल्ह्यांतून प्रवास होतो. निरनिराळ्या रूपांत श्री गणेशमूर्ती आहेत. त्याही कुठे डोंगरात, खडकात, कुठे नदीकाठी आहेत, त्यामुळे अष्टविनायकाची यात्रा करणार्या भाविकाला यात्रेबरोबरच पर्यटनाचाही अनुभव मिळतो. अशा या अष्टविनायकाची महती केवळ महाराष्ट्रापुरती नाही, तर संपूर्ण भारतभर पसरली आहे.


श्री अष्टविनायक दर्शन यात्रा
लेण्याद्रि
ओझर
नाशिककडे
जुन्नर
भिमाशंकर
मुंबईकडे
मुंबईकडे
नारायणगाव
पारगाव
कवठे
नगरकडे
नगरकडे
देवदैठण
शिरूर
बेलवंडी
मंचर
घोडेगाव
कन्हेरसर
मलठण
खेड
पाबळ
रांजणगाव
कर्जत
खोपोलीफाटा
महड
चाकण
देहू
आळंदी
शिक्रापूर
जामखेड कडे
खंडाळा
लोणावळा
तळेगाव
मोशी
श्रीगोंदे
काष्टी
अढळगाव
धरमतरकडे
देहूरोड
थेऊर
हडपसर
दौंड
सिद्धटेक
पाली
मुळशीधरण
उन्हेरे
पुणे
चौफुला
पाटस
तपशील
देऊळ
मोठा रस्ता
लहान रस्ता
रेल्वे
खडकवासला
सासवड
सुपा
राशिनकडे
जेजुरी
सोलापूरकडे
सिंहगड
मोरगाव
पुरंदर किल्ला
पानशेत धरण
नीराकडे
नीराकडे
कऱ्हाकडे


MAYURESHWAR
MORGAON
SIDDHIVINAYAK
SIDDHATEK
BALLALESHWAR
PALI
VARADVINAYAK
MAHAD
CHINTAMANI
THEUR
GIRIJATMAK
LENYADRI
VIGNESHWAR
OZAR
MAHAGANAPATI
RANJANGAON

# पुणे जिल्ह्यातील किल्ले

पुणे जिल्ह्यात किमान २९ किल्ले आहेत. हे सर्व किल्ले तर आपण अभ्यासणारच आहोत. आता सध्या अन्य ठिकाणे बघुया. कारण किल्ले बघणे, फिरणे, अभ्यासणे हे काही फार घाईघाईत मला तरी नाही आवडत. यापुर्वी आपण दुर्ग दुर्घट भारी यामधुन काही किल्ल्यांची सफारी केलेली आहे. राहिलेली किल्ले सफारी आता तुम्हाला करुन आम्हाला कळवायची आहे.

या किल्ल्यांची नावे याप्रमाणे :-

अणघई, कुवारी, घनगड, चाकणचा किल्ला, चावंड, जीवधन, तिकोना, तुंग, नारायणगड, दौलतमंगळ , भोरगिरी, पुरंदर, प्रचंडगड (तोरणा), मल्हारगड (सोनोरी), राजगड, राजमाची, विचित्रगड, विसापूर, लोहगड, शिवनेरी, सिंदोळा, सिंहगड, हडसर, धाकोबा दुर्ग, इंदुरीचा किल्ला (गढी), जीवधन, कोरीगड (कोराईगड), उंबरखिंड, रायरेश्वर, नाणेघाट, सुभानमंगळ मोहनगड, निमगिरी, रोहीडा, तैलबैला

## आता सर्व प्रथम पुणे शहर

पुण्याचा संदर्भ बिंदू (Zero milestone) हा पुण्यातील कॅम्प भागात असलेल्या जनरल पोस्ट ऑफिसच्या इमारतीबाहेर आहे. पुणे शहर हे सह्याद्री पर्वतरांगाच्या पूर्वेस, समुद्रसपाटीपासून ५६० मीटर (१, ८३७ फूट) उंचीवर आहे. भीमा नदीच्या उपनद्या मुळा व मुठा यांच्या संगमावर हे शहर वसले आहे. पवना व इंद्रायणी या नद्यादेखील पुणे शहराच्या वायव्येच्या भागांतून वाहतात.

पुणे हे पेठांचे शहर म्हणून प्रसिद्ध होते. पुणे शहर हे पूर्वीच्या मध्यवस्तीतल्या नदीकाठच्या पेठांपासून वाढत जाऊन, नवीन उपनगरे जोडली जात विस्तारत गेले आहे. या पेठांची नावे बहुतकरून आठवड्यातील वारांनुसार, तसेच ज्यांनी या पेठा वसवल्या अशा इतिहासकालीन व्यक्तींच्या नावांवरून- नाना फडणीस, नारायणराव पेशवे, सदाशिवरावभाऊ, सरदार रास्ते- ठेवली गेली आहेत. १६२५ मध्ये शहाजीराजे भोसले यांनी रंगो बापूजी धडफळे यांची पुण्याच्या प्रशासकपदी नियुक्ती केली. रंगो बापूजी धडफळे यांनी कसबा पेठ, सोमवार पेठ, रविवार पेठ आणि शनिवार पेठ या पेठा बांधल्या. १६३० मधील आदिलशहाच्या हल्ल्यानंतर दादोजी कोंडदेव यांनी या पेठांची पुन्हा उभारणी केली. पुण्यातील पेठांची नामावली अशी:

कसबा पेठ, रविवार पेठ ऊर्फ मलकापूर पेठ, सोमवार पेठ (हिला शाहापूर पेठ म्हणत), मंगळवार पेठ (हिचे जुने नाव शास्तापुरा पेठ), बुधवार पेठ ऊर्फ मुहियाबाद पेठ, गुरुवार पेठ ऊर्फ वेताळ पेठ, शुक्रवार पेठ, शनिवार पेठ, गंज पेठ ऊर्फ मीठगंज (महात्मा फुले पेठ ?), सदाशिव पेठ, नवी पेठ, नारायण पेठ, भवानी पेठ, मलकापूर पेठ (म्हणजेच रविवार पेठ), मुहियाबाद पेठ (म्हणजेच बुधवार पेठ), नाना पेठ, रास्ता पेठ (जुने नाव शिवपुरी पेठ), गणेश पेठ, वेताळ पेठ (म्हणजेच गुरुवार पेठ), सेनादत्त पेठ, नागेश पेठ (म्हणजेच न्याहाल पेठ), भवानी पेठ (टिम्बर मार्केट असलेली), घोरपडे पेठ.

**कसबा पेठेतील उल्लेखनीय स्थळे** कसबा गणपती मंदिर : हे पुण्याचे ग्रामदैवत आहे. , कुंभारवाडा, गावकोस मारुती मंदिर, तांबट आळी , त्र्यंबकेश्वर मंदिर, पुण्येश्वर मारुती मंदिर, शिंपी आळी, शेख सल्ला याचा दरगा, सातततोटी हौद

त्वष्टा कासार देवी मंदिर : ही देवी कासार समाजाची कुलदेवी समजली जाते. देवांचा कारागीर विश्वकर्मा त्याचा मुलगा त्वष्टा, हा धातूपासून भांडी बनविण्यात निष्णांत होता. या त्वष्टा चे वंशज ते त्वष्टा कांसार .

**तांबट आळी हेरिटेज स्कुल :** पुण्यातील तब्बल साडेतीनशेहून अधिक वर्षांच्या पारंपरिक कलेचे जतन करतानाच तिला आधुनिकतेचा साज चढवत तीनशेहून अधिक प्रकारची तांब्यांची ‘अपमार्केट’ उत्पादने बनविणारे भालचंद्र कडू परदेशी विद्यार्थ्यांमध्ये लोकप्रिय ठरले आहेत. शिवाजी महाराजांपासुन ही गल्ली आहे. आजपर्यन्त त्यांनी परंपरा जपली आहे. कडु हे स्वता: विविध आर्ट शाळेत जाऊन तांब्याची भांडी बनवण्याची कार्यशाळा घेत असतात.

## सदाशिव पेठ

सदाशिव पेठ, पुणे हा पुणे शहरातील एक भाग आहे. जुन्या शहरातील या भागाला सदाशिवराव भाऊंचे नाव देण्यात आले. पानिपतच्या लढाईमध्ये सदाशिवराव भाऊंना वीरगती प्राप्त झाली. त्यानंतर ह्या पेठेला सदाशिव पेठ असे नाव देण्यात आले. हि पेठ पुणे शहराच्या मध्यवर्ती भागात मोडते. या पेठेत मराठी ब्राह्मण वस्ती जास्त प्रमाणात आहे. पुण्यातील असंख्य जुने वाडे येथे आजही बघायला मिळतात. आणि इथे राहणाऱ्या लोकांनी स्वतःची एक नवीन शैली तयार केली आहे. ह्या शैलीमुळे मराठीमध्ये "सदाशिव पेठी" हे नवे विशेषण तयार झाले आहे.

## सदाशिव पेठेतील महत्वाची स्थळे:

भारत इतिहास संशोधन मंडळ,

राजा दिनकर केळकर वस्तू संग्रहालय

नेहरू क्रीडांगण,

सर परशुरामभाऊ महाविद्यालय,

भरत नाट्य मंदिर,

टिळक स्मारक मंदिर,

मराठा चेंबरस ऑफ कॉमर्स

खुन्या मुरलीधर,

विश्रामबाग वाडा,

सारस बाग ,

भिकारदास मारुती

## पुण्यातील देवालयांची गमतीशीर नावे. . .

**बटाट्या मारोती** या मंदिरांच्या नावाचा इतिहासही मोठा रंजक आहे. ब्रिटीशांच्या काळात शनिवार वाड्यासमोर बटाट्याचा बाजार भरला जात होता त्यामुळे त्या मारोती मंदिराला बटाट्या मारोती असं नाव देण्यात आलं.

**भांग्या मारुती** पेशव्यांच्या काळात बुधवार पेठेत ज्या ठिकाणी भांग विकली जायची त्या ठिकाणचा मारुती म्हणजे भांग्या मारुती, पानिपतावर झालेल्या मराठ्यांच्या पराभवानंतर मारूतीची मूर्ती जागेवरून कलंडली असं मानण्यात आलं त्या मारुतीला नाव मिळालं डुल्या मारुती.

**पोटशुळया मारुती** ज्या मारुतीला नमस्कार केल्यावर पोटदुखी थांबते तो पोटशुळया मारुती. ब्रीटीशांच्या काळात पुण्यातील ससून रुग्णालय बांधण्यासाठी आणलेले काही पत्रे उरले. ही उरलेले पत्रे ज्या मारुतीच्या मंदिरासाठी वापरण्यात आले तो झाला पत्र्या मारुती.

**खुन्या मुरलीधर.** हे देऊळ सदाशिव पेठेत, भोपटकर मार्गावर, म्हणजे पेरुगेट चौकीवरून बाजिराव रोडकडे जाताना उजव्या बाजूस इंडियन बँकेच्या शाखेजवळ आहे.



या मुरलीधराने कुठलाही खून केलेला नाही. हे देऊळ १७९७ साली श्री सदाशिव रघुनाथ उर्फ दादा गद्रे यांनी बांधलेले आहे. त्यावेळी इस्ट इंडिया कंपनीचा अधिकारी मि. बॉईड हा सैनिकांसह मंदिरावरून जाऊ लागला असता गद्रे यांनी नेमलेल्या अरबांनी त्याना अटकाव केला तेव्हा लढाई होऊन शे-पन्नास माणसे ठार झाली म्हणून याला खुन्या मुरलीधर असे नाव पडले असा इतिहास आहे.

या मंदिराच्या स्थापनेनंतर शंभरेक वर्षांनी इथल्याच चौकात रँद आयर्स्ट वधाच्या प्रसंगी ज्यानी इंग्रजांकडे चुगली केली त्या द्रविड बंधूंचे चापेकर-रानडे यांनी मध्यरात्री खून केले (१८९९). पुढे त्यानाही इंग्रजानी फासावर चढविले. या खून प्रकरणाचा चुकीने संदर्भ जोडून चुकीने 'खुन्या'नावाशी संबंध जोडला

जातो तो चुकीचा आहे असे जाणकार सांगतात. इंग्रज अधिकारी आणि अरब यांच्या चकमकीमुळेच त्याला 'खुन्या' असे नाव पडले आहे. ज्या मंदिराजवळ क्रांतीकारक चाफेकर बंधूंनी ब्रिटिशांना फितूर झालेल्या रामचंद्र रानडेची हत्या केली. त्या मंदिराला नाव मिळालं खुन्या मुरलीधर. ह्या नावामुळे पुण्याचा इतिहास आठवतो.

## जिलब्या मारुती



तुळशीबागेच्या तोंडाशी पूर्वी हलवायांची दुकाने होती. इथे असलेल्या मारुतीजवळ दोन प्रसिद्ध जिलेबीची दुकाने होती. हलवाई या मारुतीला जिलेबीची माळ घालत. त्यामुळे या मारुतीला जिलब्या मारुती नाव पडले. येथील मंदिरात हनुमानाची सुबक संगमरवरी मूर्ती आहे. तुळशीबागेतील पुजारी पूर्वी या ठिकाणी राहत असत. त्यापैकी फाटक यांची ही जागा होती. जिलब्या मारुतीची मूळ मूर्ती रस्तारुंदीकरणात भंगल्यानंतर इथे नवीन मूर्तीची लहान देवळात प्रतिष्ठापना करण्यात आली. हे मंदिर दक्षिणाभिमुखी आहे. जिलब्या मारुतीमागे आंबीलओढ्याकाठी पूर्वी स्मशानभूमी होती. काही वर्षांपूर्वी महापालिकेने रस्ता रुंदीकरणासाठी खोदला असता इथे रेखीव आणि भक्कम असे 'सतीचे मंदिर' सापडले. या मंदिरात सतीच्या पूजा साहित्यादी वस्तूही सापडल्या. हे मंदिर शितोळे घराण्यापैकी असावे, असाही निष्कर्ष काढण्यात आला.

## भिकारदास मारुती

हे मंदिर सदशिव पेठेत आहे. आणि हा बस स्टॉप देखिल आहे.



## उंबऱ्या गणपती



पूर्वी लक्ष्मीरोडवर एका ठिकाणी उंबराची बरीच झाडे होती. उंबराच्या झाडाखाली पारावर हा गणपती होता, म्हणून त्याला उंबऱ्या गणपती संबोधले जाऊ लागले. सध्या सिमेंट इमारतींच्या गराड्यात उंबराच्या झाडाखाली लहानशा मंदिरात हा गणपती विसावला आहे.

ही शेंदूरचर्चित गणेशमूर्ती एक फूट उंचीची असून नाजूक संगमरवरी मखरात बसवलेली आहे. मूर्ती किमान १०० वर्षे जुनी आहे. १९७६पर्यंत हा गणेश लक्ष्मीरोडच्या कडेला लक्ष्मणराव लिमये यांनी विकत घेतलेल्या वाड्यात ही मूर्ती होती. त्यांच्याकडेच या गणपतीच्या पूजेअर्चेची जबाबदारी आहे. लोकमान्य टिळकांनी या गणपतीच्या उत्सवास सुरुवात केली.

### हत्ती गणपती मंडळ. नवी पेठ, पुणे.



### गुंडाचा गणपती



दुसरे बाजीराव पेशवे यांच्या १८१०-११ मधील रोजनिशीमध्ये नागोजी गुंड यांच्या घराजवळील गणपती असा जो उल्लेख आहे, तोच गणपती आज "गुंडाचा गणपती' म्हणून प्रसिद्ध आहे. कसबा गणपतीप्रमाणे कसब्यातील गणपतीचे दुसरे जागृत स्थान म्हणजे गुंडाचा गणपती होय. या मूर्तीचे दर्शन घेतल्यानंतर मूर्तीवरील नजर हटत नाही आणि दर्शनाचा परिणाम दीर्घ काळ मनावर राहतो. दर्शनातच आनंद

देणारी ही मूर्ती आहे. हत्तीचे शिर मानवी शरीरावर ठेवल्यावर तंतोतंत दिसेल अशी ही मूर्ती आहे. हत्तीच्या शिरोभागातील गंडस्थळे, मोठे कान आणि प्रशस्तपणा या मूर्तीमध्ये पूर्णपणे उतरला आहे. सुमारे साडेचार-पाच फूट उंचीची ही मूर्ती पूर्णपणे दगडाची असून शेंदरी रंगात आहे. चतुर्भुज, दोन्ही पाय खाली सोडून बसलेला गजानन, अशी ही मूर्ती आहे.

## चिमण्या गणपती

सदाशिव पेठेतील हे एक प्रसिद्ध स्थान. ही मूर्ती सुमारे तीन फूट उंचीची, डाव्या सोंडेची व अंगभूत मुकुट असलेली आहे. या मूर्तीच्या स्थापनेचा इतिहास अज्ञात आहे. हे मंदिर शास्त्री कुटुंबाच्या मालकीचे आहे. पूर्वी हे मंदिर पटवर्धन व त्याहीपूर्वी काळे यांच्या मालकीचे असल्याचा उल्लेख सापडतो. येथे तांदूळ टिपण्यासाठी खूप चिमण्या येत असत व त्यावरूनच या गणपतीचे नाव चिमण्या गणपती पडले असावे.

## पालखी विठोबा गणपती

गणपतीची मूर्ती सहसा पारावर आढळत नाही. परंतु, पालखी विठोबाजवळील पारावर एका छोट्या मंदिरात अशी मूर्ती होती. झाडांच्या मुळांमुळे हे मंदिर एका बाजूने काहीसे उचलले गेले होते. अलिकडेच या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यात आला आहे. आता पाच फूट उंचीचे नवे मंदिर उभारण्यात आले आहे. येथे गणपतीची शेंदरी, दगडी व चतुर्भुज बसलेली मूर्ती आहे. खालचा उजवा हात अभय हस्त आहे. डाव्या पायावर डावा हात असून, त्यावर मोदक व सोंड आहे.

## पार्वतीनंदन गणपती

गणेश खिंडीतील हे गणपतीचे पुण्यातील जुने स्थान आहे. चतुःश्रृंगीच्या देवळाकडून विद्यापीठाकडे जाणाऱ्या रस्त्यावर एका बोळात हे मंदिर आहे. देवळाच्या समोर तीन दगडी दीपमाळा आहेत. देवळात प्रवेश करताना उजवीकडे तोंड केलेला व शेपूट उंचावलेला मारूतीही आहे. उजवीकडे तोंड असेलेल्या

मारूतीच्या मूर्ती सहसा दिसत नाहीत. या गणपतीची मूर्ती अडीच ते तीन फूट उंचीची असून, शेंदूरचर्चित चतुर्भुज आहे. मूर्तीला अंगचा दगडी मुकुट आहे.

## मद्रासी गणपती

अपोलो चित्रपटगृहाजवळील दाक्षिणात्य पद्धतीचे गोपूर कोणाचेही लक्ष वेधून घेतो. गोपुरावर देवता, यक्ष व गणांच्या मूर्ती असून, कीर्तीमुखही दिसून येते. दाराच्या वर आणि गोपुराच्या खाली अडीच ते तीन फूट उंचीची गणपतीची चतुर्भुज मूर्ती आहे. त्याच्या डाव्या हाताला शंकर-पार्वती आणि कार्तिकस्वामींच्या सुरेख मूर्ती आहेत. उजव्या बाजूला बालाजी आणि लक्ष्मीच्या मूर्ती आहेत. गणपतीच्या मूर्तीस वस्त्र घातलेले असल्याने मूर्ती स्पष्ट दिसत नाही.

शहरात मंदिरांच्या नावावरुन अनेक घरं, कार्यालयं, दुकानांचे पत्ते नोंदविलेले आहेत. एवढंच नव्हे तर महापालिकेकडून देखील डुल्या मारूती चौक , पत्र्या मारुती चौक , पासोड्या विठोबा चौक अशीच नावं देण्यात आली आहेत. त्यामुळे मंदिरांची नावं बदली गेली तर पुणेकरांचा किती गोंधळ उडेल हे तुम्हा सांगायची गरज नाही.

## बिजवर विष्णू



शनिवार पेठेतील श्री विष्णू मंदिरात विष्णूची सुबक मूर्ती आहे. या मूर्तीशेजारीच श्री लक्ष्मीचीही मूर्ती आहे. पण ही मूर्ती लहान आहे. विष्णू-लक्ष्मीचा हा जोडा काहीसा विजोड वाटतो. त्यामुळे ही विष्णूची दुसरी बायको असावी, असा अंदाज बांधून पुणेकरांनी या विष्णूला बिजवर विष्णू नाव ठेवले.

लक्ष्मीची पहिली मूर्ती भंगल्याने ही दुसरी लक्ष्मीची मूर्ती आणली गेली असावी,

असा अंदाज मंदिराचे मालक पद्ममाकर बापट व्यक्त करतात. २२ मार्च १९३८ रोजी रखुमाबाई लिमये यांनी या विष्णूमूर्तीची स्थापना केली. मंदिराची जागा रखुमाबाईंचे यजमान सरदार विठ्ठल लिमये यांना १८०७ मध्ये दुसऱ्या बाजीरावाने बक्षीस दिली. सध्याच्या मंदिराची इमारत १८१०मध्ये बांधलेली आहे.

**त्रिशुंड गणपती मंदिरः** मंगळवार पेठेत असलेले हे कोरीव शिल्पकामाने नटलेले शिल्पसमृद्ध मंदिर.

**राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनी, खडकवासला : (नॅशनल डिफेन्स अकॅडेमी).**

सैनिकी प्रशिक्षण देणारी भारतातील एक महत्त्वाची संस्था. पुणे शहराजवळ खडकवासला येथे ही संस्था असून तिन्ही सैनिकी दलांचे प्राथमिक प्रशिक्षण विद्यार्थ्यांना देण्याची सोय या संस्थेत आहे. भूसेना, नौसेना व वायुसेना या दलांतील अधिकाऱ्यांचे शिक्षण सुरुवातीस एकत्र केले जावे, या उद्देशाने १९४५ साली तत्कालीन हिंदुस्थान सरकारने नॅशनल वॉर अकॅडेमी वर्किंग कमिटी नेमली. या कमिटीचे अध्यक्ष फील्ड मार्शल सर क्लॉट ऑकिनलेक व उपाध्यक्ष अमरनाथ झा हे होते. दुसऱ्या जागतिक महायुद्धात तीनही सेनाविभागाचे परस्परांशी सहकार्य हे अत्यावश्यक आहे, ही गोष्ट लक्षात आली होती. म्हणूनच स्वतंत्र भारतातही अशा प्रकारच्या संयुक्त सैनिकी शिक्षणसंस्थेची मुहूर्तमेढ रोवण्यात आली. ह्या संस्थेचे नाव प्रथम नॅशनल वॉर अकॅडेमी ठेवावे आणि साधारणपणे २, ५०० छात्रांसाठी ४ वर्षे मुदतीचा शिक्षणक्रम ठेवावा असे ठरले. या संरक्षण प्रबोधिनी सूदान सरकारने दुसऱ्या महायुद्धात भारतीय सेनेने सूदानमध्ये केलेली महत्त्वाची कामगिरी लक्षात घेऊन एक लाख पाउंड देऊ केले व महाराष्ट्रराज्याने सु. २, ८३३ हेक्टर जमीन दिली. तसेच भारताच्या इतर घटक राज्यांनीही प्रत्येकी ५ लाख रु. दिले. खडकवासल्यापासून समुद्र फार लांब नाही व पुण्यात हवाई दलाचा तळ आहे, म्हणून राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीसाठी खडकवासल्याची निवड करण्यात आली. परंतु बांधकाम होण्यात लागणारा कालावधी लक्षात घेता ४ जानेवारी १९४९ रोजी डेहराडून येथे एक इंटर सर्व्हिसेस विंग स्थापन करण्यात आले. ६ ऑक्टोबर १९४९ रोजी पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या हस्ते खडकवासल्याच्या वास्तूची पायाभरणी झाली. डिसेंबर १९५४ मध्ये वास्तूचे काम जवळजवळ पूर्ण झाले व १६ जानेवारी १९५५ रोजी मुंबई राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री

मोरारजी देसाई यांनी राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीचे उद्‌घाटन केले. या संस्थेतून ५ जून १९५५ रोजी पहिली तुकडी शिक्षणक्रम पूर्ण करून बाहेर पडली. त्यावेळी शिक्षणक्रम तीन वर्षांचा होता व त्यांपैकी शेवटच्या वर्षांचा अभ्यासक्रम भूसेना, नौसेना व वायुसेना यांनी आपआपल्या शिक्षणसंस्थांमध्ये पूर्ण करून घ्यावा, असे ठरविण्यात आले.

डब्ल्यू. एक्स. मस्कारेन्हस यांनी ह्या वास्तूचे स्थापत्याचे काम केले, आहे. मुख्य इमारतीस 'सूदान ब्लॉक' ही संज्ञा दिली असून ६० वर्ग, प्रशस्त ग्रंथालय, संग्रहालय, सभागृह हे सूदान ब्लॉकचे मुख्य भाग आहेत. प्रबोदिनीचे प्रमुख कार्यालयही येथेच आहे.

प्रबोधिनीत १, ८०० छात्र शिक्षण घेतात. सेनेची गरज वाढल्यामुळे घोरपडी येथे आणखी ३०० छात्रांची शिक्षिणाची व्यवस्था करण्यात आली. तथापि १९८७ मध्ये हा विभाग खडकवासल्याला हलविण्यात आला. या प्रबोधिनीत कमांडंट, लेफ्टनंट जनरल अथवा तत्सम हुद्याचे अधिकारी असतात व पाळीपाळीने तीनही सेनाविभागांतून ते निवडले जातात. कमांडंट व डेप्युटी कमांडंट हे वेगवेगळया विभागांचे असतात. शालेय शिक्षण प्राचार्याच्या देखरेखीखाली चालते. प्राचार्य व शिक्षक यांची निवड व नेमणूक राज्य लोकसेवा आयोगामार्फत करण्यात येते.

१६ ते १८ १/२ वर्षे वयाच्या विद्यार्थ्यांच्या प्रवेशपरीक्षा मे व डिसेंबरमध्ये केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत दर दोन वर्षांनी घेण्यात येतात व त्यांतून निवडलेले विद्यार्थी निवड मंडळापुढे चाचणीला जातात. वैद्यकीय परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची गुणक्रमांनुसार यादी तयार करण्यात येते व त्यांतील पहिल्या ३३० विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जातो. छात्रांचा शिक्षणाचा आणि भोजन–निवासाचा खर्च सरकारमार्फत करण्यात येतो.

शालेय शिक्षणक्रमाव्यतिरिक शिस्त, नेतृत्व व लष्करी शिक्षण यांचा अभ्यासक्रमात समावेश असतो. तीन वर्षांनंतर जवाहरलाल नेहरू विद्यापीठातर्फे बी. ए. अथवा बी. एस्‌सी. पदवी देण्यात येते. राष्ट्रीय

संरक्षण प्रबोधिनीच्या बोधचिन्हात भूसेनेच्या दोन क्रूस आकारातील तलवारी, नौसेनेचा लंगर व वायुसेनेचा गरुड आहे व ‘सेवा परमो धर्मः’हे बोधवाक्य आहे.

## पुणे जिल्ह्यातील संशोधन संस्था :

पुणे शहरातील विज्ञान तंत्रज्ञान क्षेत्रातील विविध संस्था, उत्पादन केंद्रे, संशोधन केंद्रे तसेच प्रदर्शने यांना भेट देऊन तेथील कार्याची पाहणी करणे, तेथील वैज्ञानिक, तंत्रज्ञ, अभ्यासक यांच्याशी बातचीत करने. त्यांच्या अनुभवांमधू न प्रेरणा घेणे. हेही आपले ज्ञान वाढवणे व नविन भटकंती असे दोन्ही पण उद्देश साध्य होतात. तर भेटुया अशाच काही ठिकाणांना...

आघारकर संशोधन संस्था, पुणे विद्यापीठ - विविध विभाग, गणेशखिंड फळ बाग केंद्र, मधमाशी पालन केंद्र, शेतकी महाविद्यालय, वेधशाळा, डेक्कन कॉलेज, आदिवासी संशोधन केंद्र, केंद्रीय वनस्पती संशोधन केंद्र, महा उर्जा, सौर उद्यान, कात्रज दुध डेअरी, रेल्वे मुझियम, फुले संग्रहालय, रक्त पेढी, अन्न आरोग्य प्रयोगशाळा, साखर संशोधन केंद्र, हाफकिन इंस्टिट्युट इ.

**पिंपरी येथील 'हाफकिन इंस्टीट्यूट' –** ही एक निष्णात औषधी बनविणाऱ्या संशोधन संस्था आहे. विषारी सर्प दंश झाल्यास ते विष खात्रीने उतरविण्यासाठी दिल्या जाणाऱ्या औषधीची निर्मिती कशी होते? त्यात कोण कोणती काळजी घ्यावी लागते? याची माहिती येथे मिळते. त्यांच्या कार्याचा व्याप किती जटील आहे आणि ते करताना किती समस्यांचा विचार करावा लागतो हे आपल्याला जाणवते. धनुर्वात, पोलिओ, घटसर्प यासाठीही लशी कशा तयार करतात याची प्रत्यक्ष माहिती तेथे देतात. माणसाला जीवंत ठेवण्यासाठी खेचर, पांढरे उंदीर यांना आपल्या जीवाची बाजी लावावी लागते ह्याची जाणीव होते. नाग, मण्यार, घोणस, फुरसे अशा विषारी सर्पांच्या दंशामुळे माणसावर होणाऱ्या परिणामांचे फोटो पाहूनही अनेकांच्या अंगावर काटा आला. खेचराच्या प्रतिविष निर्मितीच्या कार्यक्षमतेपेक्षा गावठी धनगरी तटटाची कार्यक्षमता अधिक असते हे येथील संशोधकांनी सिद्ध केल्याचे ऐकून आश्चर्य वाटले. http://www. vaccinehaffkine. com

**डेक्कन कॉलेज -** लोकमान्य टिळक ज्या महाविद्यालयात शिकले ते पाहणे हा एक उत्सुकतेचा भाग आहे. त्या शिवाय तेथे आज काय काय संशोधन चालते? शेकडो, हजारो, लाखो वर्षांपूर्वी माणसाची संस्कृती, रीतभात कशी होती? त्यात कसा बदल होत गेला? हे दाखवणारी आठ दालने येथे आहेत. सारे पाहताना गुंगून आणि रंगून जायला होते. हजारो वर्षात नेवासा येथील एका खाली एक गाडल्या गेलेल्या गावांमधून सापडलेले अवशेष पाहायला मिळतात. त्यावरून स्थानिक मानवी निर्मिती आणि संस्कृती काळाच्या ओघात कशी बदलत गेली ते जाणवते. www. deccancollegepune. ac. in

**बोटानिकल सर्व्हे ऑफ इंडिया -** भारतातील पश्चिम भागातील वनस्पतींची माहिती आणि काही वनस्पतींची जोपासना या केंद्रात होते. त्यामुळे वनस्पतीचा एखादा नवीन प्रकार सापडला असा कोणी दावा केला तर त्याची शहानिशा येथे करता येते. वनस्पती संकलन करताना घ्यायची काळजी आणि त्या राखताना त्यांच्या मागील अभ्यास केवढा खोलवर असतो हे समजून येते. दीडशेहून अधिक वर्षांपूर्वी संकलित केलेली हर्बेरियम शीट्स बघायला मिळाली. वैज्ञानिक अभ्यासाच्या नोंदणीचे आणि ती राखून ठेवण्याचे महत्व समजते. http://164. 100. 52. 111/circles/Western-Circle. htm. E-mail: bsi_wcpune@vsnl. net

**कात्रज दूध उत्पादक संघ -** शहरात आपल्या दारात दुधाची पिशवी येण्यासाठी त्यातल्या दुधाला कोणकोणत्या दिव्यातून जावे लागते हे इथल्या डेअरीत पाहायला मिळते. डेअरी उभी करण्यासाठीही लोकांचा सहभाग मिळविण्यासाठी आणि त्याची सोय कण्यासाठी करावे लागलेले खटाटोपही एका लघुपटाद्वारे येथे दाखविले जातात. संकलित दुधाची प्रत तपासणी, त्यावर प्रक्रिया, त्याचे पिशव्यातून भरणे, उरलेल्या दुधाचे दही, ताक, लस्सी, क्रीम, तूप, श्रीखंड, आईसक्रीम कसे बनवितात हे ही बघायला मिळते. www. katrajdairy. com

## आयसर - इंडियन इंस्टीट्यूट ऑफ सायन्स एज्युकेशन अन्ड रिसर्च, ,

जीवशास्त्र, पदार्थ विज्ञान, रसायनशास्त्र या विषयांच्या प्रयोगशाळांमध्ये फिरून बरीच माहिती मिळते.

**आघारकर संशोधन संस्था -** गेली ५० वर्षे कार्यरत असणारी ही संस्था आहे. संस्थेचा इतिहास आणि संस्थेची वाटचाल बघताना वेळ कमी पडतो. पुराजीव शास्त्र विभागात जीवाश्म पाहताना त्यातील अभ्यासाचे आणि तर्क-विचार करून शोध घेण्याचे महत्व लक्षात येते. दगड आणि जीवाश्म यांच्यातला फरक, जीवाश्मांचे प्रकार, जीवाश्मांची निर्मिती याबद्दलही आवश्यक माहिती थोडक्यात मिळते. शेतीला पूरक असणाऱ्या नवीन वाणांचे प्रयोग काय चालतात हे ही बघायला मिळतात. www. aripune. org

**जवाहरलाल नेहरू आयुर्वेदिक वनस्पती उद्यान -** rria. nic. in - गवत, तृण, झुडप, झाड, वृक्ष, वेल अशा प्रकारच्या विविध वनस्पती एकाच जागेत आणि त्याही आयुर्वेदात औषधी म्हणून वापरल्या जातात अशा जिवंत आणि एकत्र पाहायला मिळण्याचे ठिकाण म्हणजे डहाणूकर कॉलनीच्या मागील भागातील जवाहरलाल नेहरू आयुर्वेदिक वनस्पती उद्यान. औषधी वनस्पती सारख्या दिसणाऱ्या वनस्पतीही त्याच भागात वाढविल्या गेल्या होत्या त्यांच्यामधील फरक त्यामुळे चटकन कळून येतो. त्या वनस्पतींना असणारे खास वास अनुबवता येत होते. वासाचे वर्णन करण्यासाठी आपल्याकडे फारसे शब्द उपलब्ध नाहीत. त्याची कमतरता त्या त्या वनस्पतींना त्यांच्या वासावरून नाव ठेऊन दूर केलेली आढळली. या वनस्पींची माहिती असणारे जुने नवे ग्रंथही या उद्यानाच्या अभ्यासिकेत आहेत.

**ओल्या कचऱ्यापासून वीज निर्मिती केंद्र -** मॉडेल कॉलनीच्या परिसरात दररोज ५ टन ओला कचरा वापरला जाऊन त्यापासून रोज रात्री वीज निर्माण करून या परिसरातील रस्त्यांवरील सुमारे दोनशे दिवे उजळवले जातात. तीन - चार किलोमीटर परिसरातील हॉटेले, घरे, बागा यातून पडणारा सेंद्रिय कचरा येथे आणला जातो. तो गरम पाण्याने निट धुऊन आणि पाण्यात मिसळून एका चरकात घातला जातो. तो लगदा जमिनीखालील टाकीत साठवितात, त्यामधून निघणारा वायू ज्यात मुख्यत्वे मिथेन हा ज्वलनशील

वायू असतो. तो मोठ्या रबरी फुग्यात साठवितात. त्यातील प्रदूषणकारी वायू बाजूला काढल्यानंतर तो जैव वायू जनित्रात इंधन म्हणून वापरून त्यापासून वीज निर्माण करतात. कचरा वाहतुकीच्या अनेक पाय-यांवरील खर्च वाचतो. शिवाय उत्तम खतही मिळते. अशा प्रकारचे उपक्रम आपल्याही विभागात व्हावेत असे पाहणाऱ्याला वाटते. www. punesite. com/garbage-generates-energy-at-model-colony. html

**मधुमक्षिका पालन केंद्र -** मध, मेण, परागकण, रॉयल जेली यांसारख्या पदार्थ आणि परागीभवनाने निर्माण होणारी अगणित फळफळावळ ज्या मधमाशांच्या सहकार्याशिवाय होऊच शकत नाही. याची माहिती येथील कार्यालयात इत्थंभूत पणे मिळते. मधाचा रंग, चव, वास, टिकाऊपणा कशामुळे येतो हे स्पष्ट होते. मधमाशा आपापसात कसा संपर्क करतात याविषयी एक उत्कृष्ट माहितीपट ही येथे दाखविण्यात येतो. मधमाश्यांच्या विविध जाती, त्यांची अंतर्गत रचना, त्यांना पकडून ठेऊन पोळयातून मध कसा काढतात, काही नर एखादी मादी आणि हजारो कष्टकरी मधमाशा किती झपाट्याने काम करतात हे पाहून दिग्मूढ व्हायला होते. संस्थेचा पत्ता: ११५३ गणेशखिंड रोड पुणे ४११०१६.

**केंद्रीय जलशक्ती अनुसंधान शाला : (Central Water & Power Research Station)**

१९४५ पासून ही संस्था खडकवासला येथे कार्यरत आहे. धरणे, नद्या, पूल यांच्या प्रतिकृती या ठिकाणी बनवल्या जातात. पाण्याच्या प्रवाहाचा वेग व दिशा, देश -विदेशातील प्रकल्प, समुद्र किनारे, बंदरांची रचना, धरणे, भूस्तर, व भूकंप यांविषयी येथे संशोधन केले जाते दर्शनी भागात रस्त्याच्या रुंदीइतके म्हणजे ५ मीटरचे एक फाटक ओलांडून आत जाताना आत मध्ये काय असेल याची कल्पना येत नाही. आपण नकाशे पाहतो. कल्पनेला ताण देऊन जास्तीत जास्त किती लांब-रुंद नकाशे असतील याची कल्पना थिटी पडावी इतकी मोठे नकाशे इथे जमिनीवर बनवलेले आहेत. एक जमिनीवर केलेला नकाशा आहे. त्या नकाशात रेखाटलेल्या मुंबईतील - भायखळा ते छत्रपती शिवाजी टर्मिनस या रेल्वे मार्गावर किमान दहा माणसे तरी गाडी गाडी करून उभी राहू शकतील. हा नकाशा केवळ सपाट नाही. विशेषत:

समुद्र किनाऱ्यापासून समुद्रातल्या भागात तो उठावाचा आहे. त्यातील प्रवाहमार्ग, खाड्या, बेटे प्रमाणशीर आहेत. मुंबई, नवी मुंबई, पनवेल, वाशी, वसई, ठाणे, अलिबाग एवढा पसारा असलेला एक नकाशा किती मोठा असेल याची कल्पना करून बघा. या नकाशात पाणी भरायला सुमारे एक तास लागतो. त्यानंतर त्या पाण्यात भरती ओहोटीच्या लाटा संगणकाच्या आधारे चाललेल्या यंत्राच्या सहाय्याने कृत्रिमरित्या तयार केल्या जातात. त्यांचा किनार पट्टीवर आणि तेथे होऊ घातलेल्या बांधकामावर काय परिणाम होईल याचा अभ्यास केला जातो. मुंबईत होऊ घातलेल्या नवीन विमानतळाच्या जागेसाठी नदी प्रवाह बदलल्यामुळे कोणते परिणाम होऊ शकतील याचा अभ्यास सध्या चाललें आहे. अशा प्रकारची विविध बंदरांची आठ प्रतिरूपे या आवारात आहेत. त्या शिवाय या पेक्षा छोटी - म्हणजे एक हजार चौरस मीटर इतकी - छोटी प्रतीरुपेही पाण्याने होणाऱ्या धूपेचा अभ्यास करण्यासाठी बांधली आहेत. एकंदरीत अफाट मोठी मिनिएचर बघून आपण लिलिपुटच्या राज्यात आलो नाही ना अशी शंका यायला लागते. तर नक्की भेट द्या. cwprs. gov. in.

**भारतीय उष्ण कटिबंधीय संशोधन संस्था - इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ ट्रॉपिकल मेटेऑरॉलॉजी, (वेधशाळा) पुणे :** हवामानखाते आणि हवामानाचा अंदाज एक थट्टेचा विषय झालेला आहे. १९६२ साली पुण्यात स्थापन झालेल्या संस्थेत हवामान शास्त्राचा अभ्यास केला जातो. मोसमी पावसाचे व हवामानाचे पूर्वानुमान सांगण्याची महत्त्वाची जबाबदारी ही संस्था सांभाळते आहे. हवामानाचा वेध घेऊन काही अंदाज करण्यासाठी किती वेग वेगळया प्रकारची मापने करावी लागतात हे या संस्थेच्या भेटीत लक्षात येते. हवामान नुसतेच अनुमान अंदाजाने दिले जात नाही तर त्यासाठी खूप बाबींची निरीक्षणे मिळवावी लागतात हे येथे आल्यावर जाणवते. देशातील पहिले उपग्रह दळणवळण केंद्र जिल्ह्यातील जुन्नर तालुक्यात आर्वी येथे आहे. ‘विक्रम’ या नावाने ओळखले जाणारे केंद्र १९७१ पासून येथे कार्यरत आहे. तसेच खोडद येथे एक मोठी अवकाश दुर्बीणही आहे.

## भारत इतिहास संशोधक मंडळः

इथले ऐतिहासिक वस्तूंचे संग्रहालय अतिशय जबरदस्त. वीरगळ, गधेगाळ, जुन्या मंदिरांचे अवषेश, दुमिळ मूर्ती, शिलाहारकालीन, यादवकालीन अस्सल ताम्रपट, शिवकालीन, पेशवेकालीन कागदपत्रे, औरंगजेबाच्या पंजाची मुहर असलेले अस्सल फर्माने, जुन्या काळातले दुर्मिळ नकाशे, चित्रशाळेतील जुनी चित्रे सारेच कसे अगदी बघण्यासारखे.

मात्र हे बघायला सकाळी ९ च्या दरम्यान जावे लागते आणि कमीत कमी ७/८ माणसे असल्याशिवाय संग्रहालय दाखवीत नाहीत. स. ११. ३० पर्यंत खुले असते. शक्यतो शनिवार-रविवारी सकाळी ११ च्या आत जावे. एंट्री फी १०/- फक्त. ४-५ जण बरोबर असतील तर अजून बरे. बऱ्याचदा कोणी दाखवायला नसतो तिथे, पण संग्रहालय अप्रतिम आहे. दादोजी कोंडदेव, शहाजीराजे, औरंगजेब, मलिक अंबर, शाहू महाराज (सातार्याचे), छत्रपती राजाराम, इ. इ. व्यक्तींची अस्सल पत्रे, जुने शिलालेख, अनेक मोठमोठे जुन्या पद्धतीचे नकाशे, मराठी आरमाराशी संबंधित जहाजांची चित्रे, अप्रतिम देखण्या हस्ताक्षरांतील हस्तलिखिते, असे अनेक काही सापडेल तिथे.

## मराठी विज्ञान परिषद

या संस्थेच्या वतीने दरवर्षी मुलांच्या सुट्टीमध्ये वेगवेगळी विज्ञान विषयक शिबिरे आयोजित केली जातात.

मराठी विज्ञान परिषद पुणे विभाग , टिळक स्मारक मंदिर, टिळक रस्ता, पुणे ४११०३० संजय मो. नं. - ९५५२५२६९०९

इ -मेल jagrut1230@gmail. com, mavipa. pune@gmail. com

http://mavipapunevibhag. blogspot. in/

**गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था :** (स्थापना १९३०) ज्येष्ठ अर्थतज्ज्ञ धनंजयराव गाडगीळ यांच्या मार्गदर्शनाखाली या संस्थेची वाटचाल प्रामुख्याने झाली. या संस्थेच्या ग्रंथालयात सुमारे २. २५ लाख ग्रंथ व नियतकालिके असून अनेक अभ्यासक, संशोधक यांचा लाभ घेतात.

**राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा (एन. सी. एल. ) :** रसायन शास्त्र व रासायनिक प्रयोग विज्ञान या क्षेत्रांत शास्त्रीय व औद्योगिक दृष्टिकोनातून संशोधन करण्यासाठी या संस्थेची स्थापना जानेवारी, १९५० मध्ये पुण्यात करण्यात आली. कृषी-रसायने, पेट्रोरसायने, औषधे यांबाबतचे संशोधन येथे चालते.

**आंतरविद्यापीठ ज्योतिर्भौतिकी केंद्र (IUCAA- आयुका):** ज्येष्ठ शास्त्रज्ञ जयंत नारळीकर यांच्या नेतृत्वाखाली या संस्थेची स्थापना एप्रिल, १९८८ मध्ये झाली. खगोल शास्त्र व ज्योतिभौर्तिक विज्ञान या विषयांतील अध्यापन व संशोधनाचे कार्य या संस्थेत चालते.

**प्रगत संगणन विकास केंद्र (Center for Development & Advance Computing CDAC)** स्थापत्य शास्त्र व पारंपरिक विज्ञान यांचा संगणनाच्या साहाय्याने विकास करण्यासाठी या संस्थेची स्थापना करण्यात आली. या संस्थेने परम-महासंगणक (Super Computer) बनवण्यात यश मिळवले होते. ज्येष्ठ शास्त्रज्ञ विजय भटकर यांचा या संस्थेच्या उभारणीत मोठा वाटा आहे.

## पुण्यातील काही संग्रहालये:

### राजा दिनकर केळकर संग्रहालय:

पुण्यात असलेले एक अतिशय उत्तम संग्रहालय. केवळ एका व्यक्तीच्या अफाट कष्टांतून, चिकाटी आणि अथक मेहनतीतून उभे राहिलेले हे अप्रतिम संग्रहालय. डॉ. दिनकर केळकर यांनी त्यांच्या कलेच्या प्रेमातून भारतीय संस्कृतीचे घडविलेले सर्वांगसुंदर दर्शन म्हणजे हे संग्रहालय. डॉ. दिनकर केळकर यांनी ६० वर्षे सतत प्रयत्न करून, भारतभ्रमण करून जमवलेल्या अनमोल २१, ००० वस्तूंचा नजराणा म्हणजे हे संग्रहालय. पत्ता : १३७७-७८, नातू बाग, बाजीराव रोड जवळ, शुक्रवार पेठ, पुणे - महाराष्ट्र ४११००२

दूरध्वनी : ०२०-२४४८२१०१, २४४६१५५६, २४४७४४६६ वेळा : सोमवार ते रविवार सकाळी १० ते संध्याकाळी ५.

http://rajakelkarmuseum. com/

### राष्ट्रीय चित्रपट संग्रहालय



पुणे शहरात लॉ कॉलेज रोडवर एकेकाळी प्रभात स्टुडिओ होता. डेक्कन पासुन १ कि. मी. अंतरावर आहे. नंतर त्या जागी फिल्म अँड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया (FTII) ही संस्था सुरू झाली. त्या संस्थेच्या प्रांगणात राष्ट्रीय चित्रपट संग्रहालय आहे.

या चित्रपट संग्रहालयात नव्या जुन्या चित्रपटांच्या फिल्म, चित्रफिती, पोस्टर्स व चित्रपट माध्यमाशी संबंधित बऱ्याच गोष्टींचा संग्रह केला गेला आहे. संस्थेच्या आवारात एक ३३०प्रेक्षक क्षमतेचे व ४० जण बसू शकतील असे एक, अशी दोन चित्रपटगृहे आहेत. याशिवाय या संस्थेचे पुण्यातच कोथरूडला २०० क्षमतेचे एक सिनेमाघर आहे.

## राष्ट्रीय युद्ध संग्रहालय

हा परिसर झाडांने वेढलेला असल्याने तसेच आजुबाजुला सुंदर हिरवळ असल्याने प्रसन्न वाटतो. राष्ट्रीय युद्ध संग्रहालय, घोरपुरी लाइन्स, दोबाडवाडी, घोरपडी, पुणे, महाराष्ट्र ४११००१





**महात्मा फुले वस्तू संग्रहालय -** कारखान्यांची प्रतिरूपे, विविध पाणलोट क्षेत्रांचे उठावाचे नकाशे, पारंपारिक पद्धतीने बनविलेल्या कलाकुसरीच्या - कागदाच्या लगद्यापासून प्लास्टिक, चीनी माती, चांदी इ. वापर करून बनविलेल्या वस्तू, पेंढा भरून ठेवलेले प्राणी आणि पक्षी अशी विविध प्रकारांची दालने असलेल्या या संग्रहालयात विज्ञान तंत्रज्ञाच्या काही अविष्कारांचे दर्शन होते. त्याच बरोबर येथे संगणकाच्या वापरासंबंधी आपल्या गरजेप्रमाणे शिकविण्याची व्यवस्थाही आहे. संस्थेचा पत्ता घोले रस्ता, शिवाजीनगर, पुणे ४११००४

**गांधीभवन -** स्वत:च्या आयुष्यात स्वत:वरच अनेक प्रयोग करून त्यांची निरीक्षणे गांधींनी आपल्या पुस्तकात लिहिली - माझे सत्याचे प्रयोग. पर-अनुभवातून किंवा यंत्राच्या अनुभवातून येणारे निरीक्षण आणि निष्कर्ष आणि स्वानुभवातून येणारे निरीक्षण आणि निष्कर्ष यात निश्चितच फरक असणार. गांधींनी असाच आणखी एक लोकांना जागृत आणि सक्रीय करण्याचा प्रयोग केला तो म्हणजे अहिंसात्मक सत्याग्रह. या वाटचालीची प्रत्यक्ष वार्ताचित्रे संकलित करून तयार केलेला एक प्रभावी चित्रपट येथे पहावयास मिळतो. त्याशिवाय म. गांधींच्या प्रेरणेने चाललेल्या खादी ग्रामोद्योगाच्या कार्यातील पारंपारिक तंत्र ज्ञान आणि त्याला विचारपूर्वक दिलेली जोड येथे प्रदर्शनात पाहायला मिळते.

**ट्रायबल म्युझियम** कोरेगाव रोडवर हे मुझियम आहे. महाराष्ट्राच्या सहयाद्री आणि गोंदवा भागातुन अने वस्तु गोळा केलेल्या आहेत. Artifacts from







## आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय

महाराष्ट्र शासनाने १९६५ साली आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थे अंतर्गत आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय स्थापन केले. राज्यातील आदिवासी जमातींच्या हस्तकला वस्तू व दैनंदिन वापरातील सुमारे १२८२ वस्तू संग्रहालयात प्रदर्शित केल्या आहेत. राज्याच्या पर्यटन विभागाने या संग्रहालयास 'प्रेक्षणीय स्थळ' म्हणून घोषित केले आहे.

एकंदरीत महाराष्ट्र राज्यातील आदिवासी विकास विभाग विस्तृत अशा यंत्रणेद्वारे आदिवासी विकासाचे काम करत आहे. राज्यातील आदिवासी विकास विभाग एकीकडे आदिवासी उपयोजना राबवताना विभागातील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याचे काम विभागातील दुसऱ्या यंत्रणेकडून करून घेत असते. तसेच आदिवासी जमातींच्या विषयावरील संशोधन व मूल्यमापनाचे काम संलग्न यंत्रणेकडून करून घेते. तसेच राज्यातील बेरोजगार सुशिक्षित तरुणांना बीज भांडवल उपलब्ध करून देणे व त्यांना अर्थसहाय्य देण्याचे काम राज्यातील आदिवासी विभागातील शबरी महामंडळाकडून करण्यात येते. शेकडो वर्षांपूर्वीच्या सांस्कृतिक, आणि आजच्या नैसर्गिक वातावरणात जगणाऱ्या विशेषत: महाराष्ट्रातील आदिवासींची माहिती या केंद्रात मिळते. आदिवासींच्या जीवनात निसर्गाला खूप महत्वाचे स्थान आहे. त्यांचे जगणे निसर्ग पूरक आहे. त्यांच्यातील विविध कला, रचना, भाषा आणि अगदी विज्ञान-तंत्रज्ञानाचा वापरही समजून सांगण्यात येतो. एकमेकात गुंतविलेल्या लाकडी तुकड्यांचा बनविलेला हलता नाग, काचेच्या बाटलीचा आत असलेली फुललेली रवी, हरिणाच्या कातड्याचा वाघाच्या वाद्यांनी बांधलेला ढोल इ. मधील आदिवासींचे तंत्र कौशल्य अचंबित करणारे आहे. http://trtimah. gov. in

**संदर्भ : नॅशनल सेंटर फॉर ॲडव्होकसी स्टडीज, पुणे.**

## दर्शन म्युझियम

ह्या संग्रहालयात आवाज आणि प्रकाश शो आहे. साधु वासवानी ह्यांच्या जिवनावर पुर्ण १०० मिनिटांचा ३ डी शो आहे. येथे प्रवेश शुल्क नाही. गुरुवार वगळता सकाळी ११ ते संध्याकाळी ७ पर्यत म्युझियम उघडे असते.



साधू वासवानी मिशन, १० साधू वासवानी पथ, जीपीओ जवळ, पुणे रेल्वे स्टेशन, पुणे, महाराष्ट्र ४११००१, ९१-२०-४००६४४७

# पुण्यातील वैशिष्ट्यपूर्ण पर्यटन केंद्र

## कॅमेरा म्युझियम

स्वतःच्या व्यस्त दिनक्रमातून जपलेली स्वतःची अशी खास आवड म्हणजे छंद. छंदांचे प्रकार वेगवेगळे असू शकतात. काहींचे छंद स्वतःपुरते मर्यादित असतात. तर काहींच्या छंदांना संग्रहालयाचे स्वरूप प्राप्त होते. असेच छंदातून निर्माण झालेले हाजी फरीद शेख आमीर यांचे फरीदस् कॅमेरा म्युझियम हे आग्नेय आशियामधील पहिले कॅमेरा संग्रहालय आहे. पहिल्या कार्डबोर्ड बॉक्स कॅमेऱ्यापासून आजच्या कॉम्प्युटराईज्ड कॅमेऱ्यापर्यंतचे सात हजार प्रकारचे कॅमेरे त्यांच्या संग्रहालयात आहेत.

अधिक माहितीसाठी नक्की भेट द्या.

**संग्रहालयाचा पत्ता**
फरीदस् कॅमेरा म्युझियम, फरीद मंजिल, कोंढवा बुद्रुक, साई सर्व्हिस स्टेशनशेजारी, पुणे : ४८. मोबाइल : ९३७१२६८२९०, दूरध्वनी – ०२० २६९३४३९६

# मुजुमदार गणेशाची तीनशे वर्षांची परंपरा



**अनुपमा मुजुमदार,**

तीनशे वर्षांची ऐतिहासिक परंपरा असलेला सरदार मुजुमदारांचा गणपती उत्सव म्हणजे अवघ्या पुण्याचे भूषण!

छत्रपती शिवाजी महाराज यांचे वडील शहाजीराजे भोसले यांना पुणे व सुपे या दोन परगण्यांची जहागिरी आदिलशाहीकडून मिळाली. त्यानंतर शहाजीराजांनी मुजुमदारांच्या पूर्वजांना, नारो गंगाधर ऊर्फ अयाबा यांना सुपे प्रांताच्या मजमूचा अधिकार दिला. मजमू हा शब्द फारसी असून त्याचा अर्थ राज्याच्या महसूल वसुलीचा हिशेब असा आहे. तेव्हापासूनच हे प्रभुणे घराणे मुजुमदार नावाने ओळखले जाऊ लागले. पुढे, शाहू महाराज दक्षिणेत आल्यावर, नारो गंगाधर यांनी त्यांना मदत केली. त्यामुळे त्यांना सर्व राज्याच्या मजमूचा अधिकार मिळाला. नारो गंगाधर यांची समाधी मुजुमदार वाड्याशेजारी कसबा पेठ येथे सुस्थितीत आहे.

श्री क्षेत्र मोरगाव हे पुण्याच्या नजीक. तेथे सरदार मुजुमदारांचा वाडा होता, तो पुढे मोरया गोसावींना अर्पण करण्यात आला. नारो नीळकंठ मुजुमदार यांना मोरगाव येथे क-हा नदीत स्नान करत असताना 'डोक्यावर हिरा असलेला' नर्मदेय गणपती मिळाला. तो प्रसाद मानून त्यांनी घरी आणला. तेव्हापासून मुजुमदारांनी दरसाल भाद्रपद शुद्ध प्रतिपदेला गणपतीचा उत्सव साजरा करण्यास सुरूवात केली. त्यानंतर 1708 मध्ये नारो गंगाधर प्रभुणे - मुजुमदार यांना शाहू महाराजांनी संपूर्ण मराठी राज्याचा मजमू (वसुली)चा अधिकार बहाल केला. केवळ गजाननकृपेमुळेच संपूर्ण मराठी राज्याच्या 'मजमू'चा अधिकार आपल्याला प्राप्त झाला आहे असे मानून गंगाधरपंतांनी घराण्याची परंपरा असलेला हा उत्सव दर वर्षी तेवढ्याच भव्यतेने करण्याची प्रथा अखंड चालू ठेवली. त्याची समाप्ती पंचमीला होते. संगीताचे रसिक जाणकार आणि इतिहास संशोधक सरदार आबासाहेब मुजुमदार यांनी हा उत्सव लोकाभिमुख केला. ती प्रथा मुजुमदारांच्या वंशजांनी चालू ठेवली आहे.

पुण्यातील कसबा पेठेत शनिवारवाड्याजवळ सरदार मुजुमदारांचा वाढा आहे. 1770 मध्ये हा वाडा पुण्यात बांधला गेला. 30 ते 35 खोल्यांच्या या वाड्यात दर्शनी कोरीव दरवाजा - छोटा दरवाजा, आतील



बांधकाम - कोरीव काम, हंड्या - झुंबरे असलेला गणेश महाल आहे. हा वाडा ऐतिहासिक वास्तू म्हणून जाहीर झाला आहे. अडीचशेवर्षांपूर्वीच्या या वाड्यात सरदार मुजुमदार यांचे 1894 ते 1973 या काळात वास्तव्य होते. वाड्यातील गणेश महालात भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून उत्सवाची सुरुवात होते. प्रतिपदेला मुजुमदारवाड्यातील खालच्या देवघरात वर्षभर असलेली 'श्री' मूर्ती वाजतगाजत वर, गणेशमहालात आणली जाते. तेथे लाकडी नक्षीदार मयूरासनावर तिची विधिवत प्रतिष्ठापना केली जाते. लघुरुद्र, ब्रह्मणेस्पती सुक्त व अथर्वशीर्षाची सहस्रावर्तने होऊन षोडशोपचार पूजा केली जाते. मोठी पारंपरिक पार्श्वभूमी लाभलेला, पुण्यातील सर्वांत जुना गणपती मुजुमदार कुटुंबीयांनी तसाच चालू ठेवला आहे.

१८७, कसबा पेठ,

मुजुमदार वाडा, सरदार मुजुमदार मार्ग,

शनिवार वाड्याशेजारी, पुणे – ११

दूरध्वनी – ०२०- २४५७९३६४

# बेस्ट बुकसेलरचा वाडा




**सदाशिव सखाराम शिवदे**

पुण्याच्या लक्ष्मी रोडवरील सिटी पोस्टासमोर दिमाखाने उभा असलेला तीन मजली गोडबोलेवाडा हा पुस्तकविक्रीचे मुख्य भांडार म्हणून प्रसिद्ध होता. तो वाडा म्हणजे ल. ना. गोडबोले यांनी १९११ साली विकत घेतलेली लाकडी वास्तू, अधिक त्याच घराला लागून असलेली नारळाच्या बागेची १९३० साली विकत घेतलेली दोन गुंठे जागा यांचा संगम. तो गर्डरवर उभा केला गेला आहे. रानडे इंजिनीयरनी ती भव्य इमारत उभी केली. लोखंडी गर्डर्स इमारतीत वापरण्यास पहिल्या महायुद्धानंतर सुरुवात झाली. गोडबोलेवाडा उभारताना त्याचा पाया बेसॉल्ट या दगडात बांधण्यात आला. शिसे ओतून पायाचे दगड पक्के केले गेले. गर्डर्सची फ्रेम तयार करून पायामध्ये प्लेट बसवण्यात आल्या. शिशाचा वापर मजबुतीसाठी केला गेला. गर्डर्स विलायतेतून (इंग्लंड) आयात केले गेले होते. ते घर जसेच्या तसे मजबूत आहे. त्यांचा पणतू संजय वाड्यात राहतो. ते इतिहास संशोधक आहेत. ते उर्दू आणि पारशी भाषांचे जाणकार तसेच, नाणेतज्ज्ञ व प्राचीन वस्तूंचे संग्राहक आहेत. त्यांनी एक हजाराहून अधिक शोधनिबंध विविध वृत्तपत्रांतून लिहिले आहेत. त्यांचे स्वत:चे ऐतिहासिक दस्त व दस्तऐवजांचे म्युझियम केल्याने त्या वाड्याचे वैभव टिकवून ठेवले आहे!

# अनमोल खजिना

**श्रीकांत कुलकर्णी**




पुराणकाळातील समुद्रमंथनाची कथा सर्वांना माहीत आहे. सागरातील अनमोल संपत्तीची वाटणी करून घेण्यासाठी देव आणि दानव यांच्यात ‘समुद्रमंथन’ झाले आणि त्यातून कितीतरी मूल्यवान गोष्टी बाहेर निघाल्या! खरोखरीच, सागराच्या तळाशी अनमोल संपत्तीचा खजिना असतो! कितीतरी चमत्कारिक आणि अद्‌भूत गोष्टी समुद्रात सापडतात व म्हणूनच सागराच्या तळाचा ‘शोध’ घेण्याचे काम सारखे चालू असते. शंख, शिंपले, कोरल्स हा सागरी संपत्तीचाच एक भाग आहे. अशा विविध गोष्टी गोळा करून त्यांचा प्रचंड मोठा खजिना जवळ बाळगणारे ‘हौशी छांदिष्ट’ पुण्यात आहेत. त्यांचे नाव आनंद माधव शिंदे.

आनंद शिंदे हे मुळचे पुण्याचे. ते नारायण पेठेत राहतात. त्यांचे वडील देहूरोडच्या दारुगोळा कारखान्यात नोकरीला होते. त्यांना वृत्तपत्रातील विविध विषयांवरील कात्रणे, तसेच वेगवेगळ्या प्रकारचे पत्ते, पक्ष्यांची पिसे गोळा करण्याचा छंद होता. वडिलांचा तोच वारसा आनंद शिंदे यांनी पुढे चालवला, मात्र तो शंख-शिंपल्यांच्या स्वरूपात.

शिंदे यांच्या संग्रहातील अतिशय दुर्मीळ म्हणजे ‘राशी-नक्षत्रांचा वास्तू शंख’. तो नैसर्गिकरीत्या घडलेला जगातील एकमेव शंख असावा असा शिंदे यांचा दावा आहे. प्रामुख्याने कॅरैबियन समुद्रात आढळणारा तो शंख शिंदे यांना चेन्नईत मिळाला. त्या शंखावर सिंह, मिथुन, मीन या राशींची चित्रे असून त्याशिवाय बदक, मोर आदी प्राणी आणि पक्ष्यांचीही हुबेहूब चित्रे आहेत. अर्थात ती चित्रे म्हणजे ‘प्रतीके’

आहेत असे शिंदे यांनी अभ्यासाअंती सांगितले. मात्र शिंदे यांच्यात संग्रहाची शान म्हणजे सर्वात मोठा 'गंधर्व-शंख'! त्याची किंमत सुमारे दोन ते तीन लाख रुपये आहे!

अजून बरेच काही आहे त्यांच्या संग्रहात ...आता ते सर्व तिकडे जाऊनच बघुया...

शिंदे यांनी शंखशिंपल्यांपासून दागिने, शोभेच्या वस्तू, दिमाखदार समया तयार केल्या आहेत. त्यांंनी शंख-शिंपल्यापासून गणेशमूर्तीही तयार केल्या आहेत. त्या सर्व वस्तूंना चांगली मागणी आहे. त्यातूनच शिंदे यांचा चरितार्थ चालतो. याव्यतिरिक्त शिंदे यांच्याकडे 'सागरसंपत्ती'विषयक विविध प्रकारची 'नाणी', 'टपाल तिकिटे', 'पत्रिका', 'खेळातील पत्ते' 'काड्या-पेट्या' आणि 'मरीन-लाईफ'चा इतिहास सांगणारा खजिनाही आहे. आपल्याकडील या खजिन्याचे पुण्यात कायमस्वरूपी 'संग्रहालय' व्हावे अशी शिंदे यांची मनीषा आहे.

**आनंद शिंदे**
९३७२४१०४२२ १४२, नारायणपेठ,
न. चि. केळकर मार्ग, पुणे – ४११०३०

## कमळा ची बाग फुलवण्याचा छंद :-

**www. Pimprichichwad. com वरून साभार**

एकाहून एक छंदवेड्या झालेल्या माणसांबद्दल आपण अनेकदा ऐकत असतो. चिंचवड येथे असाच एक छंदवेडा आहे. कोणता छंद असावा बरं त्यांना. . तर त्यांना आहे कमळा ची बाग फुलवण्याचा छंद. राष्ट्रीय फूल म्हणून ओळख असतानादेखील कमळ आपल्या देशात दुर्मीळ होत आहे. पण या छंदवेड्यानं आपली कमळाची बाग देश-विदेशातून रोपं मिळवून फुलवली आहे.

आठवीपर्यंत शिकलेले सतीश गदिया पन्नाशीच्या उंबरठ्यावर आहेत. बोलण्यात व्यंग असूनही त्यांचं आत्मविश्वासानं बोलणं ऐकणाऱ्याला गुंग करतं. चिंचवड येथे छोटीशी लाँड्री चालवणाऱ्या गदिया यांना कमळानं लहानपणी मोहून टाकलं होतं. आजीला देवपूजेसाठी पायपीट करून फुलं आणून देण्याची त्यांची हौस! कमळावरील प्रेमाला शाळेत असतानाच खतपाणी मिळालं. लग्नानंतर चरितार्थासाठी लाँड्री सुरू केली.

नेरळ येथील शेखर भडसावळे यांच्या बागेत कमळं आहेत अशी माहिती मिळताच त्यांनी तडक नेरळ गाठलं. भडसावळेंनी त्यांची कमळाविषयीची तळमळ पाहिली आणि त्यांना कमळाचा हौद दाखवून कमळाविषयीची माहितीही दिली. त्यामुळे भडसावळे हे या विषयातले त्यांचे गुरू झाले. त्यांनीच त्यांना कमळाचं पहिलं रोप दिलं.

घरच्यांना कळू न देता घराच्या पत्र्यांच्या छतावर लोखंडी हौद तयार करून कमळाची बाग फुलवली. त्या हौदात पहिलं कमळ आल्याची बातमी सर्वत्र पसरली तेव्हा गदिया यांच्या या छंदाचा घरच्यांना पत्ता लागला! गदिया यांनी एकशेआठ पाकळयांचं सर्वात मोठं कमळ केरळ व तामिळनाडू येथून मिळवलं. मखाना जातीचं कमळ त्यांनी बिहारमधील दरभंगा येथून मिळवलं, तर राजकमळ (व्हिक्टोरिया) कोलकात्यातील बोटॅनिकल गार्डन मधून मिळवलं. ओरिसाच्या तळयात कमळ काढताना त्यांच्या मागे मगर लागली तर बिहारमध्ये तळयात रुतून पडण्याचा अनुभव आला. परंतु, कमळाचा कंद मिळवल्याच्या आनंदात त्यांना काही वाटलं नाही. तसंच कुमोदिनीमध्ये (वॉटरलीली ) लंडनमधून पांढऱ्या

व गुलाबी रंगाची, तर केकवी रंगाची लीली त्यांना येथूनच त्यांच्या मामाच्या मुलानं आणून दिली. बँकॉकमधून केकवी रंगाचं कुमोदिनी कमळ त्यांना त्यांच्या मित्रानं दिलं. न्युझीलंडमधील पिवळया व गुलाबी रंगांची कुमोदिनी त्यांनी कोलकात्यातून मिळवली. त्यांनी महाराष्ट्रातील अनेक जंगलंही पिंजून काढली.


मखना जातीचे कमळाचे पान

त्यांचा छंदेवेडेपणा पाहून त्यांचे सासरे सुभाष रुणवाल यांनी आळंदीपासून दोन किलोमीटर अंतरावर डुडुळगाव येथे अर्धा एकर जागा दिली. गदिया यांनी आपली महाराष्ट्रातील एकमेव व पहिली 'ओम कमळबाग' तिथंच फुलवली आहे. येथं कुमोदिनीचे तीस प्रकार तर कमळाचे पाच प्रकार त्यांनी अनेक ठिकाणाहून मिळवून जोपासले आहेत. त्यांचा संपूर्ण दिवस कमळांच्या सान्निध्यात तिथंच जातो. त्यांनी स्वत: कमळावर विविध प्रयोग करून वेगवेगळया प्रजाती निर्माण केल्या आहेत.

त्यांची 'ओम कमळ बाग' प्रेक्षकांना पाहण्यासाठी सदैव खुली असते. तिथं महाराष्ट्रातल्या कानाकोपऱ्यातील कमळप्रेमींनी भेटी दिल्या आहेत. ते कमळाचे गुणधर्म उत्तम जाणतात. कमळाच्या बियांची खीर बनवणं, कंद काढून त्यांची भाजी बनवणं, पानांवर भात बनवणं अशा काही रेसीपी स्वत: तयार करून आपल्या मित्रांना आणि नातेवाईकांना खायला घालतात. त्यांनी आळंदी, गजानन महाराज संस्थान अशा अनेक धार्मिक ठिकाणी तसेच औरंगाबाद, अहमदनगर येथील महापालिकांच्या उद्यानातही कमळांची लागवड केली.

**सतीश गदिया** ९८९०९६९९९४, **आशुतोष महाजन** ९७६७७५३०१६

## दगडांच्या रत्नांचा सम्राट :-

**श्रीकांत ना. कुलकर्णी**





'दगडांच्याही देशा. . ' असे कुसुमाग्रजांनी महाराष्ट्राला केलेले संबोधन समर्पक आहे. महाराष्ट्राची जमिन



विविध खनिजसंपत्तीने समृद्ध आहे. त्यातील दगडांचा खजिना शोधण्याचा छंद पुण्यातील मोहम्मद फसिउद्दिन मक्की यांना लागला. मक्की हे व्यवसायाने दगडांच्या खाणीचे मालक आहेत. त्यांना त्यांच्या खाण व्यवसायातूनच त्यांच्या छंदाचा शोध लागला. त्यांच्याकडे वेगवेगळया आकाराच्या, रंगाच्या, रूपाच्या वैशिष्ट्यपूर्ण दगडांचा साठा आहे. पुण्यातील पाषाण रस्त्यावरील अभिमानश्री सोसायटीतील त्यांच्या बंगल्यात दगडच दगड पाहायला मिळतात. पण मक्की हे अभ्यासू छांदिष्ट आहेत. मक्की हे मूळ कर्नाटकचे. त्यांचे वडील फसिउद्दिन मक्की कर्नाटकात शिक्षणाधिकारी होते. त्यांनी आवड म्हणून १९५१ साली दगडांच्या खाणीचा व्यवसाय सुरू केला. मक्की यांनी एम. ए. ची ( इंग्रजी) पदवी घेतल्यानंतर वडिलांच्या व्यवसायात उतरून त्यांना मदत सुरू केली.

त्यांना महाराष्ट्रात, विशेषत: पुणे , औरंगाबाद , जळगाव , नाशिक , अहमदनगर , ठाणे या जिल्ह्यांत मोठ्या प्रमाणावर दगडांची खनिज संपत्ती असल्याचे ध्यानी आले. त्यांनी त्यांचा व्यवसाय वाढवण्यास सुरुवात केली. त्यांनी स्वत:च्या खाणीतून परदेशात प्रयोगशाळांना, महाविद्यालयांना अभ्यासासाठी दगड पाठवले. मक्की यांनी स्टोन कटिंगनंतर त्याचे पॉलिशिंग करता करता दगडांचा अभ्यास सुरू केला. त्यामुळे

त्यांना कोणताही दगड पाहताक्षणी तो कोणत्या प्रकारचा आहे हे चटकन ओळखता येऊ लागले. त्यांना  दगडांसोबत काम करताना दगडांचे आकार, रंग, सौंदर्य भावले. त्यांनी ‘सुंदर’ दगड स्वता:च्या संग्रही ठेवण्यास सुरुवात केली. मक्की यांना तो नंतर छंदच जडला.

मक्की त्यांच्या संग्रहात क्रिस्टल, उल्का, पायराइट्स,  अमेथिस्ट, आगेट, ग्रीन अपोफोलिट, कॅव्हेन्झाईट, झिओलाईझ, जल गोल्डाईट अशा विविध प्रकारच्या दगडांचे दीड हजारांहून अधिक नमुने आहेत.

झिओलाईझ, जल गोल्डाईट यांसारखी दुर्मीळ खनिजे सजावटीसाठी व शैक्षणिक संशोधनासाठी वापरली जातात. ती जळगाव , नाशिक , अहमदनगर येथील शाकूर येथे आढळून येतात. जल गोल्डाईट हे दगडखनिज काळया रंगाचे असते. त्याला छोटे छोटे केस असतात. तसे विविध दगड मक्कीं यांच्या संग्रही आहेत. मक्की वैशिष्ट्यपूर्ण दगडखनिज मिळाले, की स्वत: खाणीत उतरतात. त्यांच्या हाती अनमोल खजिना लागतो.

मक्की यांना, १९८८ साली नगर जिल्ह्यात कॅल्शियम, ॲल्युमिनियम व हॅड्रोसिलिकेट यांच्या संयोगाने बनलेले ‘स्कोले साईट’ हे खनिज मिळाले. त्याबाबतच्या त्यांच्या लेखनाला परदेशातील भूशास्त्रीय ‘जर्नल’मध्ये प्रसिद्धी मिळाली. त्यानंतर मक्की यांना मुंबईजवळ मिळालेल्या 'कॅल्साईट' या खनिजाबाबतच्या माहितीला जर्मनीतील 'लेपीस' या बहुचर्चित मासिकाने प्रसिद्धी दिली. 'जल-गोल्डाईट' या खनिजाला आणि त्यावरील त्यांच्या संशोधनाला अमेरिकेतील हॉवर्ड विद्यापीठाने प्रसिद्धी दिली आहे. त्यामुळे भूशास्त्रीय संपत्तीचे अभ्यासक आणि संग्राहक म्हणून मक्की यांची ख्याती सर्वदूर पसरली. त्यानंतर मक्की यांनी जगात विविध ठिकाणी भरलेल्या खनिज प्रदर्शनात भाग घेतला.  त्यांना खनिज संशोधक म्हणून अनेक नवी दालने खुली झाली. मक्की यांचा छंद व व्यवसाय परस्परांना पूरक ठरले.



खाणीतील विहिरीत खोलवर जाऊन तेथील खनिजांचा शोध घेणे हे धाडसाचे काम असते. मक्की यांनी आतापर्यंत असे साहस अनेक वेळा केले आहे. त्यातून त्यांच्या संग्रहात अनेकविध रतनांची भर

पडली आहे. खनिजांचे सुमारे साडेतीन ते चार हजार प्रकार आहेत. त्यावर केमिकल कंपोझिशन केले, की त्यातील विशिष्ट क्रिस्टल वेगवेगळे होतात. पांढरे, पिवळे, लाल, हिरवे, निळे, जांभळे असे विविध रंगांचे 'क्रिस्टल' मिळणे म्हणजे पर्वणीच असते! मक्की यांच्याकडे असे क्रिस्टल तसेच 'क्रिस्टल'च्या असंख्य थाळया' आहेत. त्यांना कर्नाटकातील म्हैसूरजवळ एका दगडात माणिक मिळाले, तर तिरुचिरापल्ली (केरळ) येथे एका खडकात जुरासिक काळातील प्राचीन असे अश्मीभूत अवशेष मिळाले. त्यांना मिळालेला ट्रिलोबाईट जीवाश्म हा चाळीस कोटी वर्षांपूर्वीचा असून त्याचे अवशेष समुद्राच्या तळाशी मिळतात. त्या जीवाश्म्याला डोके, डोळे, शेपूट ही आहेत. तो किड्याच्या आकाराचा असून रंग काळा आहे. याशिवाय मक्की यांच्या संग्रहात हायड्रोसोअर या डायनोसोरचे अश्मीभूत अंडे आणि शार्क माशाचा दातही आहे.

मक्की यांनी त्याच्याकडील दुर्मीळ खनिजांचा फक्त साठा न करता ती खनिजे 'स्पेसिमन' म्हणून भारतातातील  काही विद्यापीठांतील महाविद्यालयांना पुरवली आहेत. त्यामुळे अभ्यासकांची सोय झाली आहे. पृथ्वी च्या उदरात अशी अनेक रत्ने आहेत. जमिनीच्या खाली मिळणार्या दगडांचे इतके विविध प्रकार असतात, की ते पाहिल्यावर आपण थक्क होऊन जातो! लोकांना भूशास्त्रीय संपत्तीच्या विषयाचे अधिकाधिक ज्ञान व्हावे, ओळख व्हावी यासाठी मक्की यांची धडपड असते. त्यासाठी त्यांचा भूशास्त्रीय खनिजांचा 'खजिना' अभ्यासकांना तसेच रसिकांना खुला असतो.

**मोहम्मद मक्की**
मोबाईल – ९८२२००२८१६

# जोशी मिनिएचर रेल्वे संग्रहालय :

परदेशातल्या मिनिएचर म्युझियमप्रमाणं भारतातलं पहिलं मिनिएचर रेल्वे म्युझियम पुण्यामध्ये सुरू करण्यात आलं. लहान मुलांनीच नाही, तर मोठ्यांनीही आपले छंद जोपासावेत, यासाठी भाऊसाहेब जोशी यांच्यासारख्या हरहुन्नरी कलाकारानं या म्युझियमची संकल्पना मांडली. २६ X २६ च्या खोलीत छोट्या छोट्या रेल्वे, त्यांचे छोटे प्लॅटफॉर्म्स, छोटी छोटी माणसं, गार्डन, सर्कस. . या छोट्या विश्र्वाचं नाव जोशी रेल्वे म्युझियम. मिनिएचर अर्थात छोटी रेल्वे हे इथलं वैशिष्ट्य. रुळावर धावणाऱ्या मोठ्या रेल्वेप्रमाणं ही छोटी रेल्वेगाडी हवेत शिट्टी वाजवत पुढं जाते आणि लहानांसोबतच मोठेही अवाक होऊन पाहत राहतात. अवघ्या काही मिनिटांचा खेळ; पण त्यासाठीचे श्रम कित्येक वर्षांचे आहेत, हे पाहणाऱ्याला जाणवल्याशिवाय राहात नाही.

या म्युझियममध्ये जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड या देशांमधल्या रेल्वेंची मिनिएचर मॉडेल्स आहेत. ६५ सिग्नल्स, सुमारे एक हजार वायरिंचं जाळं, माणसांच्या छोट्या प्रतिकृती, घरं, बिल्डिंग, प्लॅटफॉर्म्स यांच्या छोट्या प्रतिकृती असं सगळंकाही मिनिएचर स्वरूपात इथं आहे. भारतात मिनिएचर रेल्वे बनविल्या जात नसल्यानं परदेशातूनच त्या आणल्या आहेत; मात्र इतर सर्व साहित्य जोशी यांनी स्वतः डिझाईन करून तयार करून घेतलं आहे.

जोशी मिनिएचर रेल्वे संग्रहालयातील काही प्रकाशचित्रे :



पत्ता : १७/1 ब/२, GA कुलकर्णी मार्ग, संगम छापखान्याच्या समोर, कोथरूड पुणे. महाराष्ट्र ४११०३८

दूरध्वनी : ०२०-२५४३५३७८ टीप : रेल्वे शो साठी कमीत कमी ४ प्रेक्षक आवश्यक



## मनशक्ती केंद्र , लोणावळा

महाराष्ट्रात पश्चिम घाटात सह्याद्री माथ्यावर मुंबई-पुणे हमरस्त्याला लागून लोणावळा शहराच्या निसर्गरम्य परिसरात 'न्यू वे'चे मनशक्ती प्रयोग केंद्र कार्यरत आहे. गेली चाळीस वर्षे मनशांतीकरीता हजारोंच्या संख्येने लोक येथे येत आहेत. ताणमुक्त व अर्थपूर्ण जीवनासाठी, गर्भसंस्कारापासून मृत्यू-पश्चात जीवनापर्यंत तीस प्रकारचे अभ्यास वर्ग आणि किमान साठ इलेक्ट्रॉनिक यंत्रे व कम्प्युटर आधारित चाचण्या (टेस्टस्) येथे चालू असतात. 'मनशक्ती रेस्ट (रिसर्च, एज्युकेशन, सॅनेटोरियम ट्रस्ट) न्यू वे' ही सामाजिक कार्य करणारी विश्वस्त संस्था पुणे येथे धर्मादाय आयुक्तांकडे नोंदलेली आहे. 'मनशक्ती' केंद्राच्या अधिकृत शाखा

मुख्य प्रयोग केंद्र – लोणावळा, वरसोली, शक्ती –शांती स्थळ – लोणावळा (मनशक्ती न्यू वे आश्रम)

शरीर-मन स्वास्थ केंद्र – तळेगाव (मनशक्ती रेस्ट न्यू वे संचलित), ग्रामसेवा समिती केंद्र – चाकण (मनशक्ती रेस्ट न्यू वे संचलित)

शैक्षणिक सहली निसर्गाच्या कुशीत वसलेल्या जगप्रसिद्ध मनशक्ती प्रयोगकेंद्रात शैक्षणिक सहल/अभ्यास दौरा/किंवा सहज भेट अशा कोणत्याही निमित्ताने या! मनाची शक्ती आणि शांती मिळवण्यासाठी येथे आपल्याला पाहायला मिळेल. . भव्य प्रदर्शन संकुल व रम्य परिसर!

१ )प्रदर्शन संकुलातील दालने

* गर्भातील बाळाची जडणघडण * मुलांच्या समस्यांवरील उपाय * तरूणांसाठी ध्येयपूर्तीच्या दिशा * रोगमुक्तीवर उपाय मार्गदर्शन * मत्सरघातापासून मुक्ती

* मनशक्ती मनशांती मिळविण्याचे मार्ग * मृत्युपश्चात जीवन

(२) ग्रंथसाहित्य प्रदर्शन (३) यंत्रचाचण्या प्रदर्शन (४) गुहा ध्यान (५) शक्ती-शांती स्थळ (६) सौर उर्जा प्रकल्प (७) पवन उर्जा प्रकल्प (८) गोशाळा आणि शेती व गांडुळ-खत प्रकल्प (९) ऑफसेट प्रिंटिंग प्रेस

सहलीसाठी कोण सहभागी होऊ शकेल?

शाळा, कॉलेजचे विद्यार्थी, युवक, तरुण शिक्षक, प्रोफेसर, मुख्याध्यापक महिला मंडळे, विविध कंपन्या/सरकारी किंवा खासगी ऑफिसेस/संघटना यातील कर्मचारी, पदाधिकारी, पोलीस, विविध क्लबस्, प्रौढ व ज्येष्ठ नागरिक संघ इ.

सहलीच्या वेळा : स. ९ ते दु. १२ आणि दु. ३ ते सं. ६; केंद्राला सुटी नसते.

सहल ठरविण्यासाठी इमेल करा - gsk@manashakti. org

# काही वाडे

पुणे शहराची पुर्वीची ओळख म्हणजे हे जुने वाडे होते. आता बरेचसे वाडे अस्तित्वात नाहीत. किंवा फार मोडतोड झालेल्या अवस्थेत आहेत. तर बघुया असेच काही वाडे

## शनिवारवाडा

पहिला बाजीराव पेशवा यांनी सन १७३६ साली १३ खोल्यांचा पेशव्यांचा राजवाडा म्हणजेच शनिवार वाडा बांधला. हा वाडा पेशव्यांचे मुख्य ठिकाण होते. हे पुण्याच्या संस्कृतीचे प्रतिक आहे. सुरक्षिततेला जास्त प्राधान्य देऊन शनिवारवाडयाची रचना करण्यात आलेली आहे. शनिवार वाडयाचे मुख्य प्रवेशद्वार दिल्ली दरवाजा या नावाने व इतर दरवाजे गणेश, मस्तानी, जंभळ, खिडकी अशा नावांनी ओळखले जातात. शनिवार वाडयासमोर पहिल्या बाजीरावाचा घोडयावर बसलेला पुतळा आहे. शनिवारवाडयात गणेश महल, रंग महल, आरसा महल, हस्तीदंत महल, दिवाणखाना आणि कारंजे अशी अनेक ठिकाणे पाहावयास मिळतात. पेशव्यांचा इतिहास सांगणारा लाईट व म्युझिक शो शनिवार वाडयावर दररोज आयोजित केला जातो. पेशव्यांची सत्ता असलेला हा राजवाडा सन १९२८ मध्ये आगीमुळे नष्ट झाला. आता फक्त राजवाडयाच्या मजबूत तटबंदी असणाऱ्या भिंती व सुरक्षिततेसाठी अणकुचीदार टोक असणारा भक्कम दरवाजा शिल्लक आहे. इथे लाइट आणि साउंड शो आयोजित केला जातो. संध्याकाळी ७. १५ ते ८. १० मराठी शो असतो. व ८. १५ ते ९. १० इंग्रजी शो असतो.




## महात्मा फुले वाडा

घोले रोड वर हे संग्रहालय आहे. या वडीलोपार्जित घरातच जोतिराव फुल्यांचा ११ एप्रिल १८२७ रोजी जन्म झाला. मिशनऱ्यांच्या शाळेत त्यांचे शिक्षण झाले. १८४८ साली त्यांनी देशातील मुलींची पहिली भारतीय शाळा आपल्या सहकार्यांच्या मदतीने भिडे वाड्यात सुरू केली तेव्हा सावित्रीबाई याच वाड्याचा उंबरठा ओलांडून सार्वजनिक जीवनात पहिले पाउल टाकत्या झाल्या. भारतीय स्त्रियांचे सार्वजनिक जीवन अशारितीने इथूनच सुरू झाले. भारतातील प्रौढ साक्षरता अभियान १८५४ साली याच वाड्यात सुरू झाले. रात्रीच्या स्त्री-पुरूषांच्या दोन पहिल्या शाळा याच वाड्यात काढण्यात आल्या.





विधवांच्या बाळंतपणाची सोय करणारे केंद्र आणि देशातील पहिला भारतीय माणसांनी चालवलेला अनाथाश्रम {बाल हत्त्या प्रतिबंधक गृह} इथेच सुरू झाला. अस्पृश्य मानल्या गेलेल्या समाजाला पाण्याचा हक्क देणारा पहिला हौद याच वाड्यात आहे. १८७३ साली याच घरात स्थापन करण्यात आलेला सत्यशोधक समाज देशातील सर्वदूर ग्रामीण भारतात पसरलेले पहिले जनआंदोलन ठरले. इथे बसूनच जोतीरावांनी मराठीतील पहिले आधुनिक नाटक "तृतीय रत्न" लिहिले. १८६९ साली शिवरायांचा पोवाडामय चरित्रपट इथेच निर्माण झाला. अमेरिकेतील निग्रोंच्या मुक्ती चळवळींना अर्पण करण्यात आलेला "गुलामगिरी" हा ग्रंथ इथेच जन्माला आला. शेतकऱ्यांचा असूड आणि सार्वजनिक सत्यधर्माचे

क्रांतिकारक तत्वज्ञान इथेच साकारले. आयुष्यातील ५०वर्षे सामाजिक परिवर्तनाची लढाई लढून जोतीराव -सावित्रीबाईं दोघांचेही पार्थिव इथेच विसावले. जोतीरावांची समाधी याच वाड्यात आहे.

१९६७ साली सरकारने हे घर राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित केले. १९९३ साली छगन भुजबळ यांच्या पुढाकारातून त्याची पुनर उभारणी करून ते राष्ट्रपती डा. शंकर दयाळ शर्मा यांच्या हस्ते राष्ट्रार्पण करण्यात आले. या वाड्याला राष्ट्रपतींनी समतेचे राष्ट्रतीर्थ म्हणून "समता भुमी" घोषित केले.

## आगा खान पॅलेस

द्वितीय सुलतान मुहम्मद आगा खान यांनी १८९२ मध्ये बांधलेला हा राजवाडा पुण्यातील सर्वात मोठे ऐतिहासिक स्मारक आहे. तसेच भारतीय इतिहासातील याचे योगदान देखील तितकेच अवर्णनीय आहे. ६. ५ हेक्टर मध्ये विस्तारलेला हा राजवाडा १९६९ मध्ये आगाखान (चवथा) याने भारत सरकार ला देणगी स्वरूपात दिला होता. येथील बगिच्यात त्यांचे स्मारक बांधण्यात आलेले आहे. गांधी मेमोरियल सोसायटीचे आगाखान पॅलेस हे इटालियन आर्चेस व लॉन आहे. महात्मा गांधींच्या पत्नी कस्तूरबा गांधी आणि त्यांचे सचिव महादेव देसाई येथे सुमारे ३५ वर्षे वास्तव्यास होते . ब्रिटीशांनी या जागेचा उपयोग महात्मा गांधी, कस्तुरबा गांधी व महादेवभाई देसाई यांचेसाठी भारत झोडो आंदोलनात तुरुंग म्हणुन केला होता. कस्तुरबा व महादेवभाई यांनी याच जागेत अखेरचा श्वास घेतला त्यामुळे या ठिकाणी त्यांचे स्मरणार्थ संगमरवरी स्मारक बांधण्यात आले.

वेळा : सकाळी ९:०० ते संध्याकाळी ६:००

पत्ता : आगाखान पॅलेस , पुणे नगर रस्ता, कल्याणी नगर, पुणे महाराष्ट्र ४११०१४

दूरध्वनी : ०२०-२६८८०२५०

गांधीजींच्या नित्योपयोगी वस्तूंचे छोटेसे संग्रहालय आणि प्रदर्शन देखील येथे आपणास पहावयास मिळते.

## विश्रामबाग वाडा



हा मराठा साम्राज्याचा पेशवा दुसरा बाजीराव याचा जुन्या पुण्यातील राहता वाडा होता. इ. स. १८०७ साली सुमारे ३. ५ लाख रुपये खर्चून हा वाडा बांधला गेला. शनिवार वाडा या पेशव्यांच्या वडिलार्जित वाड्यात राहण्यापेक्षा दुसऱ्या बाजीरावाने विश्रामबागवाड्यात राहणे पसंत केले. तिसर्या इंग्रज-मराठा युद्धात इ. स. १८१८ साली पुण्याचा पाडाव होईपर्यंत ११ वर्षे दुसऱ्या बाजीरावाचे येथे वास्तव्य होते. सुमारे २०, ००० वर्ग फूट क्षेत्रफळाच्या या वाड्याचा बहुतांश भाग टिकला आहे. या वाड्यात सध्या टपाल कार्यालय, नगरपालिकेच्या काही कचेऱ्या व मराठा साम्राज्यातील ऐतिहासिक वस्तूंचे संग्रहालय आहे. पुणवडी ते पुण्यनगरी पाहण्यासाठी माणसी ३ रुपये असे तिकीट दर् आहे. पुणे स्टेशन, शिवाजीनगर, स्वारगेटवरून रिक्षा, बसेस या भागात येतात. पुणे स्टेशनपासून अंदाजे ४. ५ ते ५ किलोमीटर आहे.

## गायकवाड वाडा / केसरी वाडा

हा महाराष्ट्राच्या पुणे शहरातल्या नारायण पेठेतील वाडा आहे. या वाड्यात बाळ गंगाधर टिळकांचे वास्तव्य होते. टिळकांनी चालवलेल्या केसरी वृत्तपत्राचे कार्यालयही याच वाड्यात आहे. काही वेळा टिळक वाडा अथवा केसरी वाडा असा या वाड्याचा उल्लेख केला जातो. बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांनी बाळ गंगाधर टिळकांना हा वाडा विकत दिला

या वाड्यात येण्यापूर्वी लोकमान्य टिळक सरदार विंचूरकर वाड्यात वास्तव्य करत . हा वाडा लोकमान्य टिळकांनी साली विकत घेतला. केसरी व मराठा या वृत्ततपत्रांची कार्यालयेही या वाड्यात हलवली. या वाड्यास जसा टिळकवाद्यांचा सहवास लाभला तसाच लोकमान्य टिळकांचे पुत्र हे सुधारणावादी आणि रविकिरण मंडळ यात आघाडीत असल्यामुळे सुधारणावादी चळवळी आणि काव्य वाचनांचाही लाभ झाला. या वास्तूत आता संग्रहालय आहे. वास्तूतील लोकमान्यांचा पूतळयाचे अनावरण

मोतीलाल नेहरुंच्या हस्ते झाले होते. तो चौपाटी (मुंबई) येथील टिळकांच्या पहिल्या पुतळयाची प्रतिकृती आहे. (टिळकांचा पहिला पुतळा त्यांच्या हयातीतच वाघ स्टुडिओचे संस्थापक विनायकराव वाघ यांनी १९१६ साली लोकमान्यांच्या इच्छेनुसार समोर बसवून हा पुतळा बनवून घेतला होता) इ. स. १९०५ पासुन टिळक वाड्यात केसरी संस्थेचा गणेश उत्सव होऊ लागला. लोकमान्य टिळकांची व्याख्याने तेथे होत असत. त्यांच्याशी संबंधित बर्याच वस्तूंचे उत्तम संग्रहालय आहे.

## सरदार विंचूरकर वाडा

सरदार विंचूरकर वाडा हा महाराष्ट्राच्या पुणे शहरातल्या सदाशिव पेठेतील वाडा आहे. मराठी राजकारणी, पत्रकार बाळ गंगाधर टिळक गायकवाड वाड्यावर वास्तव्यास जाण्यापूर्वी विंचूरकर वाड्यात रहात असत. केसरी छापखानाही सुरवातीस याच वाड्यात होता. बाळ गंगाधर टिळक आणि स्वामी विवेकानंदांची भेटही याच वाड्यात झाली होती. या वास्तूची मालकी कृष्णकुमार दाणी यांच्याकडे होती. त्यानंतर ती वास्तू परांजपे स्कीम कन्स्ट्रक्शन कंपनीने घेतली.

## नेहरू क्रीडांगण

पुणे महानगरपालिकेने कोट्यावधी रुपये खर्च करुन स्वारगेटजवळ आंतरराष्ट्रिय दर्जाची खेळपट्टी तयार केली आहे. पुणेकरांना या मैदानावर आता रणजी मैच बघण्याची संधी उपलब्ध होणार आहे.

**हडपसर गाडीतळाजवळचे ग्लायडिंग सेंटर**. उन्हाळयाच्या दिवसांत प्रतिमाणशी वट्ट रु. १८७/- (होय, सरकारी असल्याने कमी रक्कम अन ऑड फिगर असावी ) इतक्या दराने ३-४ मिनिटे आकाशात हजारेक फूट वर जाऊन सगळे पाहता येते.

**फातिमा नगर** इथले बोटॅनिकल गार्डनही मस्त आहे.

**खडकी** इथे दुसर्या महायुद्धात मरण पावलेल्या ब्रिटिश आर्मीतील काही सैनिकांची थडगी आहेत. अतिशय सुंदरपणे व्यवस्था राखली आहे.

**नागेश्वर मंदिर / नहाल पेठ**

हे नागेश्वर मंदिर जवळजवळ १३ व्या शतकात संत ज्ञानेश्वरांच्या काळातले आहे. , तारखा. त्याचा जीर्णोद्धार मात्र १८ व्या शतकात १७३० मध्ये झाला. हे मंदिर नागेश पेठ मध्ये जी आता नहाल पेठ म्हणुन ओळखली जाते. हे मंदिर पेशवाई रचनेत बांधले आहे. आयताकृती सभामंडप आहे. आज मंदिर इमारतींच्या विळख्यात अडकले आहे. फक्त जुणे विश्वासू लोक आणि आणि तिथील आजुबाजुचे लोक मंदिराला भेट देतात.

## बगीचे आणि तलाव

पुणे शहरात ८९ बगीचे आणि जवळजवळ तितकेच पोहण्याचे तलाव आहेत. त्यांपैकी काहींची नावे खाली दिली आहेत.

आघाडा उद्यान (राम नदीजवळ, पाषाण), आघारकर संशोधन संस्थेचे उद्यान, आयुर्वेद महाविद्यालयाचे उद्यान, इंद्रप्रस्थ उद्यान, येरवडा, एम्प्रेस बोटॅनिकल गार्डन, पुणे कँप (स्थापना इ. स. १८३०), एरंडवणा उद्यान, ओकायामा मैत्री उद्यान (पु. ल. देशपांडे उद्यान), सिंहगड रोड, कमला नेहरू पार्क, कात्रज सर्पोद्यान (राजीव गांधी प्राणी संग्रहालय), कात्रज, खडकी बोटॅनिकल गार्डन, गजानन महाराज उद्यान, गोखलेनगर, गलांडे उद्यान, कल्याणीनगर घोरपडे उद्यान, घोरपडे पेठ, जयंतराव टिळक गुलाबपुष्प उद्यान, सहकारनगर, जवाहरलाल नेहरू औषधी वनस्पती केंद्र, जिजामाता उद्यान, कसबा पेठ, पुणे प्रदीप ताथवडे उद्यान, कर्वेनगर तुकाराम उद्यान, निगडी तात्यासाहेब थोरात उद्यान दापोडी-खडकी गार्डन (आता अस्तित्वात नाही; त्या जागी फलसंशोधन केंद्र आहे) धोंडीबा सुतार बालोद्यान, कोथरूड, नवसह्याद्री उद्यान, पर्वती पाचगाव वनविहार, पानकुंवरजी फिरोदिया उद्यान, पुणे विद्यापीठाच्या प्रांगणातील उद्यान, पु. ल. देशपांडे उद्यान (ओकायामा मैत्री उद्यान), सिंहगड रोड, प्रताप उद्यान, वानवडी बाजार, फर्ग्युसन कॉलेजातील बोटॅनिकल उद्यान, फुलपाखरू उद्यान, बंड गार्डन (महात्मा गांधी उद्यान), भांबुर्डा वनविहार, वसंतराव बागुल उद्यान, सहकारनगर, मुघल गार्डन, मॉडेल कॉलनी तळे उद्यान, मॉडेल कॉलनी, यशवंतराव चव्हाण उद्यान, सहकारनगर, रमाबाई आंबेडकर उद्यान, वाडिया कॉलेजवळ, राजा मंत्री उद्यान, एरंडवणा, विठाबाई पुजारी उद्यान, महर्षीनगर, शाहू उद्यान, सोमवार पेठ, शेतकी कॉलेजातील उद्यान, श्यामाप्रसाद मुखर्जी उद्यान, कोथरूड, संभाजी उद्यान, जंगली महाराज रस्ता, सोमेश्वर उद्यान, निगडी, हजरत सिद्दिकी शाहबाबा उद्यान, ज्ञानेश्वर उद्यान, निगडी

## सारस बाग

तळ्यातला गणपती असलेले सारसबाग हे उद्यान पुण्यातील एक महत्त्वाचे पर्यटक आकर्षण आहे. पर्वतीच्या पायथ्याशी असलेल्या या बागेतील गणपती पेशव्यांचे पूजास्थान होता.

श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या कारकिर्दीत पर्वतीच्या पायथ्याशी सन १७५० साली आंबील ओढयाच्या सीमेवर एक कृत्रिम तलाव तयार करण्याचे काम सुरू झाले. तलावाचे काम सन १७५० ते १७५३ या कालावधीपर्यंत चालले होते. त्या तलावाचे क्षेत्र अंदाजे २५ एकर एवढे विस्तीर्ण होते. या तलावाचा उपयोग नौकाविहारासाठी करण्यात येत होता. तलावात सारस पक्षी सोडले होते. तलावाच्या कामाची खोदाई करीत असताना तलावामध्ये अंदाजे २५००० चौरस फुटाचे बेट तयार करून ते मंदिर व बाग-बगीचा तयार करण्याकरिता राखून ठेवण्यात आले. त्या नंतर बेटावर सुंदर बाग तयार करण्यात येऊन श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांनी या बागेचे काव्यात्मक ' सारस बाग ' असे नामकरण केले.

श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांनी सन १७८४ साली तलावाच्या बेटावर छोटेसे मंदिर बांधून तेथे आराध्य दैवत श्री सिद्धिविनायक गजाननाची स्थापना केली. साहजिकच पर्वती, सारस बाग आणि तलाव ही पुणेकरांची फिरावयास येण्याची व देवदर्शनाची ठिकाणे झाली.





## तुळशीबाग राम मंदिर

लोकहो, इंग्रजांना देशातून उखडून टाकण्याची ही सुवर्णसंधी आहे. आम्ही उत्तर भारत जिंकून घेतो. तुम्ही दक्षिणेत उठाव करा. गोऱ्यांचे मुंडके आणून देणाऱ्यास नानासाहेब पेशवे रोख इनाम देणार आहेत. सामान्य गोरा- ५०० रुपये, कलेक्टर व न्यायाधीश - १० हजार रुपये, कर्नल, मेजर किंवा कप्तान- १३ हजार रुपये, गव्हर्नर किंवा मुख्य न्यायाधीश - ५० हजार रुपये' नानासाहेबांचा हा जाहीरनामा १८५७ च्या समरप्रसंगी पुण्याच्या तुळशीबाग परिसरात चिकटवण्यात आला होता. याचाच भव्य फलक पुन्हा एकदा लावून नानासाहेबांना आदरांजली अर्पण केली गेली.

**इम्प्रेस गार्डन** मध्ये साकारणार पर्यावरण केंद्र – राहुल बजाज

पुणे- विविध दुर्मिळ वृक्ष-वेली, मनमोहक फुलांच्या प्रजातींनी बहरलेल्या निसर्गरम्य ऐतिहासिक एम्प्रेस बोटॅनिकल गार्डनमध्ये आता ऑर्किड हाऊस, तसेच आंतरराष्ट्रीय दर्जाचे पर्यावरण केंद्र उभारण्यात येणार आहे. ॲग्री-हॉर्टिकल्चरल सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया संस्थेचे अध्यक्ष राहुल बजाज यांच्या पुढाकारातून हा प्रकल्प साकारला जाणार आहे.

सुमारे शंभर वर्षांपूर्वी तयार केलेले एम्प्रेस गार्डन हे निसर्ग तसेच पक्षीप्रेमी यांचे आवडते ठिकाण झाले आहे. संस्थेच्या स्थापनेनंतर १८९२ साली हे गार्डन तयार करण्यात आले. मागील शंभर वर्षात असंख्य अडचणींना सामोरे जात संस्थेच्या पदाधिकाऱ्यांनी गार्डनमधील नैसर्गिक संसाधनांची जपणूक केली. शहरातले एम्प्रेस गार्डन निसर्ग शिक्षणाचे अत्याधुनिक केंद व्हावे, या हेतूने विविध प्रकारच्या वृक्षांच्या दुर्मिळ जातींचे संकलन करण्यात आले आहे. ह्यामध्ये वेगवेगळे पामची झाडे आहेत.

**पुणे ओकायामा मैत्री उद्यान** सिंहगड रस्तावर एक अप्रतिम उद्यान साकरलय, पुणे ओकायामा मैत्री उद्यान. जपान मधील ओकायामा शहरातील कोराक्वेन उद्यानाच्या धर्तीवर विकसीत केले आहे. आज अश्या धर्तीवर शहरांमधे बागा विकसीत करणे ही काळाची गरज आहे.

**संभाजी पार्क** पुणे शहरातील डेक्कन जिमखान्या जवळ बालगंधर्व रंगमंदिराला लागून असलेली ही एक पुण्यातील अतिशय सुंदर बाग आहे. मत्सालय व छोटासा किल्ला हे या बागेतील प्रमुख आकर्षण आहे. विविध प्रकारची झाडे, फुले, ताजे हिरवेगार गवत व कारंजी या उद्यानाच्या सौंदर्यात भर टाकतात.

**पेशवा पार्क** ही बाग पुणे शहरात स्वारगेट जवळ आहे. सारसबाग आणि पर्वतीच्या मध्ये ही बाग आहे. बागेमध्ये हिरवेगार टवटवीत गवत आहे तसेच बागेमध्ये व्यायामासाठी असणारा पादचारी मार्ग आहे. बागेमध्ये तळयाने वेढलेली एक लहान टेकडी आहे. या टेकडीवर गणपतीचे मंदिर आहे. ही जागा " तळयातला गणपती " म्हणून प्रसिध्द आहे. पेशवे पार्क ही सारस बागेच्या शेजारी आहे. पुर्वी ही बाग प्राणी संग्रहालयासाठी प्रसिध्द होती. या ठिकाणी बोटींग करण्याची सोय आहे. या ठिकाणी "फुलराणी" नावाची एक छोटीशी रेल्वे आहे जी लहान मुलांना खूप आकर्षित करते. ही बाग आता साहसी पार्क म्हणुन ओळखली जाते कारण अनेक साहसी खेळ येथे आहेत. रोप क्लाइंबिंग, वॉलक्लाइंबिंग, नेट क्लाइंबिंग, टॉवर क्लाइंबिंग, स्किडिंग, उंची सायकलिंग असे बरेच काही ३ ते १६ वयोगटासाठी आहे.










**भाटघर धरण** पुण्यापासून ४० कि. मी. अंतरावर असून हे एक सुंदर नैसर्गिक देखावा असलेले ठिकाण आहे. हे धरण वळवंडी नदीवर बांधलेले आहे. हे भारतातील सर्वात जास्त उंचीचे धरण आहे. भाटघर धरणाच्या आजूबाजूच्या परिसरात सुदंर बगीचे व वॉटर स्पोर्टस यांची योग्य निर्मिती करण्यात आलेली आहे.

**नारायणपूर** पुण्याच्या दक्षिण भागात नारायणपूर गावात संत चांगदेव व श्री दत्ताचे प्रसिध्द मंदिर आहे. यात्रेकरु या ठिकाणी येऊन जुन्या औंदुबराच्या झाडाची पुजा करतात व नारायणेश्वर मंदिराला भेट देतात. या मंदिरातील शिल्पाकृती ही यादव कालीन आहे.

**शिरवटा धरण -** कामशेत रेल्वेस्टेशनहून पश्चिमेकडे रेल्वे लाईन क्रॉसकरून ८ कि. मी. वर नाणे गावाच्या पुढे शिरवटा धरण आहे. धरणाची भिंत अडीच किलोमीटर लांब आणि ४० मीटर उंच आहे. धरणाच्या भिंतीवरून नयनरम्य देखावा बघता येतो. पावसाळयात धरण तुडुंब भरलेले असते. ट्रेकिंगची आवड असणार्यासाठी धरणाजवळच्या खांडशी गावापासून जाणार्या पाऊलवाटेने त्यामागच्या डोंगरात चढणारी पाऊलवाट डोंगरमाथा ओलांडून पलीकडच्या बाजूला काल्र्याच्या लेण्यांपाशी जाते.

**सोमवडी तलाव -** शिरवटा धरणाकडे जाणार्या रस्त्यावर उजव्या बाजूला सोमवडी गावाकडे रस्ता जातो येथे सोमवडीचा छोटा तलाव असून वनश्रीने नटलेला आहे. शांत एकांत स्थळी असल्याने पर्यटकांस विशेष आवडेल असा आहे. हा तलाव कामशेत-जांभवली रस्त्यावर आहे. याच रस्त्याने पुढे गेल्यावर जांभवली गावात रस्ता संपतो.

जांभवली गावाच्या पलीकडे कुंडली नदीच्या उगमापाशी कोंडेश्वर महादेवाचे देऊळ आहे. तीनही बाजूंनी उंचावलेल्या डोंगरात पाण्याच्या नैसर्गिक कुंडापाशी महादेवाचे देऊळ आहे. कोंडेश्वराच्या गाभार्यात देवाचा पंचमुखी मुखवटा आहे. बाहेर जुन्या काळातील उंच दीपमाळ आहे. आवारात जुनी शिल्पे आहेत. मंदिराच्या समोरच्या कड्यावर गेल्यावर खाली कोकणकडा व सह्याद्रीच्या रांगांचे सुंदर दृश्य

पहायला मिळते. पुण्याहून लोणावळयाला डांबरी रस्त्याने जाताना कान्हे रेल्वे स्टेशनच्या अलीकडे कान्हे फाटा लागतो. तेथून वडेश्वर धरणाकडे रस्ता जातो.

## डोंगर आणि टेकड्या

पुणे शहरात आणि आजूबाजूला बर्याच टेकड्या आहेत. जेव्हा केव्हा गडाकिल्ल्यांवर जाता येत नाही तेव्हा तेव्हा दुधाची तहान ताकावर भागवायला उपयोगी पडतात या टेकड्या.

कात्रजची टेकडी, गुलटेकडी, चतुःशृंगी, तळजाई, पर्वती, फर्ग्युसन कॉलेजची टेकडी, बावधनची टेकडी, बोपदेव घाट-टेकडी , येरवड्याची येरंडेश्वर टेकडी, राम टेकडी, वनदेवी टेकडी (कर्वे रोड), वाघजई, विधि महाविद्यालयाची टेकडी, वेताळ टेकडी, सिंहगड, सूसची टेकडी, हनुमान टेकडी, पुणे कँटॉन्मेंट

## पर्वती





पर्वती हे पुण्याचे स्थान दर्शविणारे प्रसिद्ध ठिकाण आहे. पर्वतीची टेकडी ही जरी शहराच्या दक्षिणेकडील भागात असली तरी सुध्दा ती शहराच्या जवळजवळ सर्वच भागातून दिसू शकते. मंदिराला 8 पायऱ्या आहेत ज्या पार्वती व देवडेश्वरांना अर्पण केलेल्या आहेत. तेथे विष्णु, गणेश व कार्तिकस्वामी यांचेही मंदिर आहे. टेकडीच्या माथ्यापर्यंत चढून गेल्यावर आपल्याला सर्व बाजूने पुणे शहराचे सुंदर दर्शन घडल्याचा आनंद लुटता येतो.



## तळजाई टेकडी

तळजाई टेकडी ही एका बाजूला सहकारनगर तर दुसर्या बाजूला सिंहगड रस्ता येथे आहे.





इथेच **पेशवा मुझियम** आहे. मुझियमच्या बाजुलाच श्रीमंत नानासाहेब पेशवे यांची समाधी आहे.





## चित्तरंजन वाटिका बाग

माडेल कोलनी, पुणे- ४११००१ हे पुणे महानगरपालिकेचे उद्यान आहे.







# वर्तक उद्यान





बालगंधर्व सिनेमागृहाच्या पुढे साधारण किलोमीटर पुढे हे उद्यान आहे. वर्तक उद्यान, ओंकारेश्वर मंदिर पुढे, जे. एम. रस्ता, पुणे.

## महाराणा प्रतापसिंह उद्यान

महाराणा प्रताप  हे उद्यान टिळक रोड च्या विरुद्ध दिशेला बाजीराव रोड येथे पुणे महानरपालिकेचे आहे. हा परिसर जुण्या पुण्याचा असुन अतिशय गजबजलेला असतो. तसेच इथे वेगवेगळी स्मारके देखिल आहेत जसे की, महाराणा प्रताप, महात्मा बसवेश्वरा , शहीद कॅप्टन सुशांत गोडबोले आणि हुतात्मा भाई कोतवाल.







## कमला नेहरु पार्क

कमला नेहरू पार्क , प्रभात रस्ता, वादारवाडी, पुणे सुमारे १० एकर जागेत हे उद्यान पसरलेले आहे. पुणे महानगरपालिका ह्या उद्यानाचे व्यवस्थापन बघते.



# ओशो इंटरनॅशनल पार्क आणि मेडिटेशन सेंटर

हे गार्डन नल्ला पार्क ह्या नावाने देखिल ओळखले जाते. सुरवातीला इथे फार कचरा होता. पण आता गार्डन एकदम छान आहे. तिथे पुतळे, दगड, झाडे फार सुंदर आहे.

१७, १ लेन, कोरेगाव पार्क , पुणे, एमएच , ४११००१ फोन नं -०२० ६६०१९९९





## मुघल गार्डन

दिल्लीच्या मुघल गार्डन सारखे गार्डन पुण्यामध्ये आहे. ४ एकरवर हे गार्डन पसरलेले आहे.

सिंहगड रोड( नरवीर तानाजी  मालुसरे रोड) पु. ल. देशपांडे जपानी गार्डनच्या पुढे, पर्वती , पुणे





# पिंपरी- चिंचवडच्या अवतीभवती

## अप्पू घर

हे निगडी पासून 2 कि. मी. व पुणे शहरापासून 22 कि. मी. अंतरावर आहे. हे दिल्लीच्या अप्पूघरासारखेच आहे. तेथे असलेले असंख्य खेळ, गंमती व बागडण्यासाठी पर्यटक आतुरतेने वाट पहात असतात. अप्पू घरात वॉटरपार्कची सोय सुध्दा आहे. असंख्य खेळांमध्ये लहान मुले रमून जातात तर तेथे असणारे सुन्दर थंडगार तळे, दुर्गामातेचे मंदिर व फिरण्याकरिता मोठया टेकडया सर्व पिढीतील लोकांना आकर्षित करतात. पण आता बरीचशी खेळणी मोडकळीला आली आहेत.

## दुर्गादेवी टेकडी -

दुर्गादेवीच्या मंदिरावरुन या टेकडीला दुर्गादेवी टेकडी हे नाव पडले. अप्पुघर पासुनच वरती जाण्यासाठी रस्ता आहे. पिंपरी - दुर्गादेवी टेकडी परिसरात हे उद्यान निगडी पोलिस ठाण्याच्या हद्दीत आहे. टेकडीवर वरपर्यन्त जाण्यासाठी रस्ते आणि बगिचा आहे.





## भक्ती शक्ती शिल्प:






या शिल्पातून फक्त संत तुकाराम महाराज आणि छत्रपती शिवाजी महाराज या दोन महान व्यक्तीच न दाखवता त्यातून भक्ती आणि शक्ती यांचा सुरेख संगम दाखवावा अशी संकल्पना त्यांनी मांडली. या दोन भव्य प्रतिमांच्या बाजूला त्यांच्या अनुनायांच्या छोट्या छोट्या सुबक प्रतिमा आहेत. त्यात हातात भगवा ध्वज घेतलेले, तलवार पाजळून लढाईच्या मोहिमेवर निघालेले मावळे पुण्याच्या दिशेने एका रांगेत दाखवले आहेत तर टाळ, मृदुंग, वीणा धारण करून भजनात दंग असलेले वारकरी देहूच्या दिशेला आहेत. पराक्रम करून युध्द जिंकायला निघालेले मावळे बहिर्गामी वर्तुळाच्या (कॉन्व्हेक्स) चंद्रकोरेच्या

आकारात दाखवले आहेत तर अंतर्मुख होऊन परमार्थसाधना करणारे वारकरी अंतर्गामी (कॉन्केव्ह) वक्ररेषेत उभे आहेत असे हे अद्भुत शिल्प समस्त पुणेकरांनी पाहिले असेलच, मुंबईहून पुण्याला जाणाऱ्या लोकांनीही कधी तरी जुन्या पुणे मुंबई मार्गाने चिंचवड, निगडी, देहू रोड या वाटेने जातांना ते पाहिले असेल आणि क्षणभर थांबून डोळयात सांठवून घेतले असेल. नसेल तर पुढच्या ट्रिपमध्ये तसे जरूर करावे. आजुबाजुला आता खुप खाण्याचे स्टॉल लागतात त्यामुळे तिथे चौपाटीचे स्वरुप आले आहे. समोरच कृष्ण मंदिर आहे.

## कोणार्क पार्क:



पाशानपासुन ५ कि. मी. वर कोणार्क पार्क आहे. सुहास जोग यांचे खाजगी मालकीचे पक्षी संग्रहालय आहे. त्यांनी गेल्या ३३-३४ वर्षापासुन जगातुन वेगवेगळया ठिकाणांवरुन हे पक्षी गोळा केले आहेत. चायना , केनिया आस्ट्रे लिया या वेगवेगळया ठिकाणांवरुन पक्षी गोळा केले आहेत. आतमध्ये फोटोग्राफीला परवानगी नाही.





## पीकाक बे

खड़कवासला च्या उत्तर –पूर्व मध्ये खडकवासला झील आहे त्याला पीकाक बे म्हणतात. हे १९४२ पासुन वाटरमैनशिप प्रशिक्षण केंद्र आहे. ह्या सुंदर जागेचा उपयोग विद्यार्थ्यांना समुद्र प्रशिक्षण, उपकरणे, नौकायन, विंड सर्फिंग, नौका–विहार, वेलर्स इत्यादी प्रशिक्षण साठी उपयोग केला जातो. ह्या भागात मोर खुप असल्याने त्याला पीकाक बे असे म्हणतात. झीलची लांबी १७ कि. मी. व रुंदी २ कि. मी. आहे. पीकाक बे मध्ये वार्षिक राष्ट्रीय अंतर्देशीय उत्तम सेलिंग चैंपियनशिप चे आयोजन होते. एन. डी. ए. मधुन बाहेर पडणार्या विद्यार्थ्यांना इथे समुद्री प्रशिक्षण दिले जाते.





**पाषाण तलाव** पुण्यापासुन १२ कि. मी. वर पाषाण तलाव आहे. तलावाचा परिसर फार सुंदर नाही. पण आजुबाजुला थोडी बसायला जागा आहे. आणि परिसर हिरवागार आहे. तुम्ही तिथे फोटो काढु शकता.






## श्री आगमधारक देवर्षी जैन आगम मंदिर:

१२२, वर्धमान नगर, कात्रज, पुणे-४११०४६ फोन नं- ०२०-२४३१८६५४




## ' प्रतिकृती ' लेक व्हु रिसॉर्ट




हे रिसॉर्ट, आगमधारक देवर्षी जैन मंदिर, कात्रज पासुन पुढे आंबेगाव खुर्द , वाघजाईनगर येथे आहे. आहे. एस. नं ४७, आंबेगाव खुर्द, वाघजाईनगर, पुणे ४११०४६

फोन नं. - +९१-९३७१०१६७७६, +९१-९५७९५१२५३१

## पुणे विपश्यना समिती

धम्म पुन्ना हे विपश्यना ध्यान केंद्र पुण्याला २००० साली स्थापित झाले आहे. सुमारे ३ एकर जमिनेवर पसरले आहे. विपश्यना ही भारतातील अतिप्राचीन ध्यानपद्धतींपैकी एक आहे. सुमारे २५०० वर्षांपूर्वी गौतम बुद्धांनी तिला पुन्हा शोधून काढली आणि सार्वत्रिक रोगांसाठी सार्वत्रिक उपाय, अर्थात जीवन जगण्याची कला ह्या रूपात सर्वांना सुलभ अशी बनविली. होती. त्यांनी त्यांच्या ३५ वर्षाच्या शासन काळात जो अभ्यास स्वता केला आणि लोकांकडुन करुन घेतला त्याचा सार म्हणजे विपश्यना आहे. त्याविषयी मला मिळालेली माहिती आणि सेंटर हे मी तुमच्याशी नंतर शेअर करणार आहे. सध्या फक्त पुण्याविषयी. पुण्याला दोन विपश्यना केंद्र आहेत. एक शहरात आहे ते धम्म पुन्ना आणि दुसरे आहे ते धम्मानंद पुण्यापासुन ३० कि. मी. वर मरकल या गावी आहे. हे गाव प्रसिद्ध आळंदी गावापासुन ८ कि. मी. वर आहे. दोन्ही ठिकाणी भेट देण्यासाठी संपर्क पत्ता- दादावाडी यार्ड, नेहरू स्टेडियम, आनंद मंगल कार्यालय जवळे, पुणे ४११००२ , +(९१) २०-२४४६८९०३. अधिक माहितीसाठी वेबसाइटला भेट द्या. https://www. dhamma. org

ई-मेल: info@punna. dhamma. org

## श्रीमोरया गोसावी यांचे संजीवन समाधी मंदिर:

प्रियन्तां खलु गाणपत्यपथगाः श्रीमोरयायोगिनो

य़ैर्भ्रष्टं जगतीतलं विमलतां कीर्त्या हि नीतं पुरा ।

तेऽद्य श्रीपवनातटे सुविमले कुर्वन्ति वासं चिरम्

रक्षन्त्वेव सदा सुमार्गजुषतस्तान् मोरयान् प्रार्थये ॥



अर्थ: भ्रष्ट झालेले हे जग ज्यांनी आपल्या कीर्तीने धवल केले, ते श्री गाणपत्य मार्गाचे अनुयायी श्रीमोरया गोसावी प्रसन्न होवोत. ते आज पवित्र अशा पवनेच्या काठावर चिरकाल वास करत आहेत. ते सन्मार्गाची कास धरणाऱ्यांचे रक्षण करोत. त्या मोरया गोसावींची मी प्रार्थना करतो.

दक्षिणवाहिनी पवनानदीच्या तीरावर श्रीमोरया गोसावींचे समाधी मंदिर आहे. इथे सदगुरू श्रीमोरया गोसावी यांनी संजीवन समाधी घेतली. हे एक जागृत देवस्थान आहे.

चिंचवड हे स्थान पुणे-मुंबई रस्त्यावर पुण्यापासून २० किलोमीटर दूर आहे. चिंचवड रेल्वे स्थानकापासून मंदिर २ किलोमीटर अंतरावर आहे. पुणे शहराच्या विविध भागामधून चिंचवड इथे येण्यासाठी महानगर पालिकेची बस सेवा उपलब्ध आहे. मुंबईकडून पुण्याकडे जाणाऱ्या राज्य परिवहन मंडळाच्या बसेस चिंचवड इथे थांबतात.

श्रीक्षेत्र चिंचवड देवस्थान पत्र व्यवहारासाठी पत्ता: चिंचवड देवस्थान ट्रस्ट, मंगलमूर्ती वाडा, चिंचवडगाव, पुणे, महाराष्ट्र, ४११०३३.

## सप्त सत्पुरुष

मोरगावच्या मयूरेश्वराने श्रीमोरया गोसावींना "तुझ्या सात पिढ्यांमधे माझा अंश राहील" असा आशीर्वाद दिला होता. या सात पिढ्यातील प्रत्येक सत्पुरुषाची एक अशी सात समाधी स्थाने श्रीमोरया गोसावी समाधी मंदिर परिसरात आहेत.

१. श्रीमोरया गोसावी इ. स. १३७५ ते १५६१

२. चिंतामणी महाराज (१) इ. स. १५६१ ते १६२५

३. नारायण महाराज (१) इ. स. १६२५ ते १७१९

४. चिंतामणी महाराज (२) इ. स. १७१९ ते १७३६

५. धरणीधर महाराज (१) इ. स. १७३६ ते १७७२

६. नारायण महाराज (२) इ. स. १७७२ ते १८०२

७. चिंतामणी महाराज (३) इ. स. १८०२ ते १८०५

तिसरे चिंतामणी महाराज निपुत्रिक होते. त्यांनी सिद्धटेक घराण्यातून गोविंद यांचा मुलगा सखाराम दत्तक घेतला. त्याचे नाव धरणीधर ठेवले. इ. स. १८०५ ते १८५२ ह्या काळात.

### श्रीमंगलमूर्ती वाडा:

श्रीमोरया गोसावींच्या समाधीचे दर्शन घेतल्यावर उजव्या हाताने गावात प्रवेश केल्यावर चिंचवड गावात संस्थानचा मंगलमूर्ती वाडा आहे. या वाड्यात मोरया गोसावींना कऱ्हा नदीत मोरगावला मिळालेली मूर्ती सिंहासनावर विराजमान झाली आहे. श्रीमंगलमूर्तीच्या जवळ उत्तराभिमुख कोठारेश्वर

नावाची जुनी गणपतीची मूर्ती आहे. शेजारी शमीचे झाड आहे. समोर प्रशस्त सभामंडप आहे. सभामंडपाचे लाकूडकाम देखणे आहे. त्यात हंड्या, झुंबरे आहेत. अष्टविनायकांच्या मोठ्या तसबिरी आहेत. उत्सवातले सर्व मोठे कार्यक्रम या ठिकाणी होतात.

या वाड्यात श्रीमोरया गोसावी यांच्यानंतर गादीवर बसणारे महाराज रहात असत. वाडा अत्यंत ऐसपैस आहे. हा वाडा इतका जुना आहे की काही भागात शिवाजी महाराज येऊन गेले होते. काही भाग चिंतामणी महाराजांनी बांधाला आहे, काही भाग नाना फडणीस आणि हरीपंत फडके यांनी बांधलेला आहे. या वाड्यातून आत गेल्यावर डाव्या हाताला सभामंडपासमोर चिंचवड देवस्थान संस्थानचे कार्यालय आहे. वाड्यात विद्यार्थ्यांच्या वेदाध्ययनाची, त्यांच्या जेवणाची व राहण्याची संस्थानतर्फे व्यवस्था केली आहे.

## श्रीकोठारेश्वर

मंगलमूर्ती वाड्या मध्ये श्रीमंगलमूर्तीच्या जवळ उत्तराभिमुख कोठारेश्वर नावाची जुनी गणपतीची मूर्ती आहे. श्रीमंगलमूर्तीच्या मागे ही मूर्ती असते. श्रीकोठारेश्वराची दररोज पूजा होते. श्रीमंगलमूर्तींची स्वारी यात्रेकरिता वाड्या बाहेर निघाल्यावरही या मूर्तींची पूजा करतात. कोठारेश्वर हे नाव पडण्याचे कारण असे की श्रीमोरया गोसावी पार्थीव (मातीच्या) गणेशाची पूजा करून ज्या जागेवर विसर्जन करित, त्या जागी ही मूर्ती श्रावण शुद्ध ६ शके १७७२ या दिवशी स्थापन केली.

श्रावण शुद्ध षष्ठीला कोठारेश्वरांचा उत्सव सुरू होतो. श्रीमंगलमूर्तींची स्वारी परत येईपर्यंत दहा दिवस याच मूर्तीची विशेष पूजा अर्चा नैवेद्य वगैरे करतात. यावेळीही येथे अन्नछत्र वगैरे चालू असते.

## निगडी



निगडी हा पुण्याच्या पश्चिमेकडील भाग आहे. एक सुनियोजित शहर अशी निगडी ची ओळख आहे निगडीत स्वामी समर्थ मंदिर

दळवीनगर येथेल गणेश मंदिर आहे. तसेच इस्कानचे श्रीकृष्ण मंदिर देखिल आहे.

**वीर सावरकर उद्यान** हा गणेश लेक ह्याच नावाने अधिक ओळखला जातो. निगडी प्राधिकरण अंतर्गत हे उद्यान येते. इथे मोकळी जागा, एक छोटा तलाव, जेष्टांना बसण्यासाठी कट्टा , लहान मुलांना खेळण्यासाठी जागा आहे. प्रवेश फी १० रुपये आहे.






## पुणे दर्शन - एम. टी. डी. सी.

पुणेमहानगर परिवहन महामंडळ (PMPML) तर्फे दररोज पुणेदर्शन सहल आयोजित केली जाते. नारायण पेठेतील टिळक वाडा (केसरी वाडा) येथून सहलीची सुरुवात होते. भारतीय स्वातंत्र्य लढ्यातील जहाल नेते लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचे घर येथे होते. त्यानंतर पेशव्यांचा शनिवार वाडा, छत्रपती शिवाजीमहाराजांचा लालमहाल, महात्मा जोतिबा फुल्यांचे घर, राजा दिनकर केळकर संग्रहालय, चतु:शृंगीचे देऊळ, आंबेडकर संग्रहालय इत्यादी ठिकाणे बघता येतात. सहलीच्या दुसऱ्या टप्प्यात पुणे-ओकायामा मैत्री उद्यान दाखवतात. जपानमधील ओकायामा शहरातील ३०० वर्षे जुनी कोराकुएन या बागेच्या धर्तीवर इथली बाग तयार केली आहे. तिथून पुढे कात्रज येथील राजीव गांधी प्राणी संग्रहालय आणि शिंद्यांची छत्री बघता येते. आगा खान पॅलेस हाही या सहलीचा एक भाग आहे. पुण्यातील पर्वती, सारस बाग आणि पेशवे बाग ही काही चुकवू नयेत अशी ठिकाणे आहेत. खरेदीप्रिय लोकांसाठी लक्ष्मी रस्ता आणि तुळशीबाग ही आवर्जून जावे अशी ठिकाणे आहेत.




Mahatma Phule Market, Mandai, Pune 2009 www.puneheritage.com

## लवासा सिटी

पुण्यातून चांदणी चौक ओलांडून पिरंगुटच्या पुढे गेले की डाव्या हाताला असलेली मोठी होर्डिंग्ज लक्ष वेधून घेतात. तिकडेच काही अंतरावरच मानवनिर्मित लवासा सिटी आहे. भारतातील हे पहिलेच 'मानवनिर्मित' हिलस्टेशन असल्याचा दावा लवासाच्या जाहिरातीत केला आहे.

व्वा, काय एक्झॉटीक लोकेशन आहे!!', 'ब्युटीफूल', 'सुंदर लँडस्केपिंग' असे उद्गार तिथे जाऊन तोंडातुन बाहेर पडतात. पण ते निसर्गाच्या विरोधात बनवले असल्याने सध्या वादग्रस्त आहे.





## इस्कॉन मंदिर कोंढवा

इथे मुख्य तीन देवता आहेत राधा कृष्ण, श्री गौर निताई, जगनाथ - बलदेव – सुभद्रा. तिरुपती मंदिराची प्रतिकृती आहे.









## गोल्फवे मिनी गोल्फ कोर्स - रात्रीच्या अंधारात चकमताना




## प्रती पंढरपुर, हडशी:

सत्य साई बाबानिर्मित हे पांडुरग शेत्र आहे. ३०० एकरच्या परिसरात पसरलेले आहे. दुपारे इथे महाप्रसाद दिला जातो. पवना डमपासुन डावीकडे वळले की रस्ता हडशीकडे जातो. इथे मेडिटेशन सेंटर देखिल आहे. इथे छोटे कन्टीन देखिल आहे. पण सोबत डबा घेउन गेल्यास निसर्गाच्या सानिध्यात मस्त जेवणाचा आनंद घेता येईल. प्रति पंढरपूर





## पुण्याची ग्रामदेवता – तांबडी जोगेश्वरी

ऐतिहासिक असल्यामुळे पुण्यात अनेक देवदेवतांची मंदिरे आहेत, भिकारदास मारुती, पत्र्या मारुती, जिलब्या गणपती, चिमण्या गणपती अशा चित्रविचित्र नावांसाठीही ती प्रसिद्ध आहेत. पण पुण्याचे ग्रामदैवत कोणते म्हणाल तर एक आहे कसबा गणपती आणि दुसरी तांबडी जोगेश्वरी ! ही पुण्याची, ग्रामसंरक्षक देवता.

ग्रामदेवता ही साधारणपणे गावाबाहेर वेशीपाशी असते, कारण तिने शत्रू आला तर त्याला वेशीबाहेर अडवून त्याचा संहार करायला पाहिजे, पण तांबड्या जोगेश्वरीचे देऊळ हे पुण्याच्या शहर भागात गजबजलेल्या वस्तीत येऊन ठेपले आहे. ज्या काळात मूर्ती बसवली गेली तेव्हा ती वेशीबाहेर, म्हणजे त्या काळच्या पुण्याबाहेर होती. तेव्हा मंदिरही नव्हते. नुसती पाषाणाची मूर्ती.

तीनशे वर्षांपूर्वी, आजच्या पुणे शहराच्या अगदी मध्यावरून, अत्यंत गजबजलेल्या गर्दीच्या भागातून आंबील ओढा वाहत होता. हा ओढा सदाशिव, शुक्रवार, बुधवार व शनिवार या पेठांच्या भागामधून वाहात जाऊन मग मुठा नदीला मिळत होता. जोगेश्वरी तेव्हा ओढ्याच्या काठी होती.

जोगेश्वरीचे उल्लेख पुराणातही सापडतात असे मत कै. राजवाडे, डॉ. केतकर यांनी नोंदवलेले आहे. ‘तां नमामी जगदधात्री योगिनी परयोगिनी’ असे योगेश्वरीचे म्हणजेच जोगेश्वरीचे वर्णन भविष्यपुराणात आहे. योगिनी हे योगेश्वरीचे दुसरे नाव. योगेश्वरीचे प्राकृत रूप म्हणजे जोगेश्वरी. योगेश्वरी संज्ञेचा उलगडा मूर्तिरहस्य व्याख्येत ‘जीवेश्वरैकस्य ईश्वरी सा योगेश्वरी’ असा केला आहे. म्हणजे, जीव आणि ईश्वर यांची एकरूपता दाखवणारी ही आदिशक्ती आहे.

अंजली कुलकर्णी – ३, विघ्नहर अपार्टमेंट, जयवर्धमान सोसायटी, बिबवेवाडी रोड, पुणे – ४११०३७

भ्रमणध्वनी : ९९२२०७२१५८

## मावळातील (मराठी) मनोमिलन :-




. चैत्र वद्य प्रतिपदेला पानशेत तलावाकाठच्या शिरकोळी गावच्या शिरकीच्या जत्रेला प्रचंड गर्दी लोटते. लोककथांनुसार, शिरकाई देवीला तिचे ठाणे मांडण्याला अतोनात कष्ट पडले-संघर्ष करावे लागले. ती देवी पाच-सहा शतकांपूर्वी काशी खंडातूनपुणे मार्गे मुठेच्या उगमाकडे निघाली, तर तिला बापूजी बुवाने खडकवासल्याच्या वरील अंगापासून जागोजाग अडवले. त्याला चुकवत, ती शिरकोळीला पोचली. तेथे धनगरांच्या -हे सह्याद्रीत गायी-म्हशी सांभाळणारे धनगर, मेंढपाळ नव्हेत - वाघजाईचे ठाणे होते. वाघजाईने शिरकाईला तिच्या शेजारी बसण्यास अनुमती दिली. तेव्हा बापूजी बुवाने लग्नाची मागणी घातली. शिरकाईने ती नाकारताच पुन्हा धुमश्चक्री झाली. शिरकाईला एका घळीत दडून काही दिवस कंठावे लागले. अखेर, शिरकाईची सरशी झाली. बापूजी बुवाला शिरकोळीपासून दहा कोस दूर ठाणगावला जावे लागले. तेथे एक कोळी उपासक त्याची देखभाल करतो. मध्यंतरी, काही वर्षे कोळी पुजारी उपलब्ध नव्हता, तेव्हा मराठेच त्याची पूजाअर्चा करायचे. वर्षात केवळ एके दिवशी, चैत्र वद्य प्रतिपदेला उत्सवाच्या वेळी, बापूजी बुवाला शिरकोळीला परतून शिरकाईच्या आसपास काही विशिष्ट भागात वावरण्याची परवानगी असते. मग उरलेले वर्षभर पुन्हा हद्दपार.

या साऱ्या कहाण्यांचा अर्थ काय? मावळात मराठ्यांची वसाहत होण्याअगोदर तेथे कोळी व धनगर समाज राहत असावेत. त्यांच्या देवता बापूजी बुवा, वाघजाई यांची आराधना होत असावी. राजवाडे यांच्या प्रतिपादनाप्रमाणे नाग व कोळी हे डोंगरद-यांतील कोळी, समुद्राकाठचे मासेमार नव्हेत - तीन-चार हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्रात वसतीला आले.

भारतीय संस्कृतीत महाराष्ट्राचे खास स्थान आहे. येथे भारतातील मूलवासी नागांची संस्कृती आणि लोखंडाची आयुधे व घोड्याचे रथ घेऊन आलेल्या आर्यांची संस्कृती यांचा मिलाफ झाला. येथे उत्तरेहून माळवा-गुजरात मार्गे दक्षिणेकडे निघालेल्या व दक्षिणेतून गोदावरी-कृष्णेच्या खो-यांतून उत्तरेकडे वाटचाल करणाऱ्या समाजांच्या संस्कृतींचा संगम झाला. येथे महाराष्ट्री, सौरसेनी, अपभ्रंश अशा प्राकृत भाषा, नाग भाषा, द्रविड भाषा यांच्या मंथनातून मराठी उपजली. गावागावातील अगणित लोकपरंपरांत त्या इतिहासाचे प्रतिबिंब पाहण्यास मिळते. त्यात महाराष्ट्राच्या सर्वसमावेशक संस्कृतीचे चित्र आहे.

**-माधव गाडगीळ**

(माधव गाडगीळ यांच्या मूळ 'सकाळ'मध्ये प्रसिद्ध लेखामधून)

# हरिराम आश्रय मठ - परमसुखाचे तीर्थक्षेत्र



तुकाराममहाराजांची दृष्टांतात जी जागा दाखविली होती त्या जागेचा शोध मुळशी तालुक्यातील भुकूम गावातील पिरंगुट घाटाच्या माथ्यावरील डोंगरावर संपला. गुढी पाडवा. २९ मार्च १९६८. या शुभदिनी हरिराम आश्रय मठाची मुहूर्तमेढ रचली गेली.

पुण्यनगरीजवळील पावन हरिराम आश्रय मठ. प्रेमनिधी श्री संत गणोरेबाबांच्या पदस्पर्शाने हजारो वर्षांनंतर या भूमीचा उदयकाळ झाला. पवित्रता प्राप्त झाली. त्यांच्याच पदस्पर्शाने ही मृण्मयी भूमी चिन्मयी झाली आहे. आता या पावन भूमीवर चैतन्य वास करीत आहे.

परमपूज्य श्री गणोरेबाबा कार्तिक शुध्द सप्तमीच्या पुण्यदिनी समाधिस्थ झाले. त्यांच्या समाधीची जागा त्यांनीच स्वत: दाखवून दिली होती. त्या ठिकाणीच त्यांना मंत्राग्नी देण्यात आला. या पवित्र जागेवर वर्षभरातच आईंच्या सांगण्यानुसार ज्ञानदेवाच्या समाधीप्रमाणे विठ्ठल-रूक्मिणीच्या तेजस्वी मूर्तीसमोर छोटे समाधी मंदिर बांधले गेले. संत सीतामाईंच्या २००३ निर्वाणवर्षीच वसुंधरेवरचे एक सुंदर वास्तुशिल्प वर्षभरातच आकारास आले. या मंदिरामुळे मठाचा चेहरामोहराच बदलून गेला. मठाच्या परिसराला भव्यता प्राप्त झाली. विठ्ठल-रुक्मिणीच्या मनमोहक, तेजस्वी मूर्तीच्या पुढील श्री गणोरेबाबांची प्रेरक समाधी ही १९७९ पासून तपोभूमीच बनली आहे. पांडुरंगाच्या मूर्तीसह मूळ समाधीत काहीच बदल न करता उभे राहिलेले समाधी मंदिर म्हणजे आईंच्या आध्यात्मिक पर्वाच्या दोन तपांची स्वप्नपूर्तीच ठरली.

पावन, पवित्र हरिराम आश्रय मठाच्या बरोबर पूर्वेला प्रेमनिधी श्री संत गणोरे बाबा व संत सीतामाई यांची समाधी मंदिरे आहेत. त्याच्या बरोबर समोर म्हणजे पश्चिमेला मठाचे प्रवेशव्दार आहे. मठाची वास्तू उंचावर व एकांत स्थळी असल्यामुळे बाराही महिने शांत व प्रसन्न वातावरण असते. मठाच्या खालच्या बाजूस पिरंगुटचा नागमोडी घाट आहे आणि पश्चिमेस डोंगर दऱ्या, छोटी-छोटी शेते यांची

निसर्गाने मुक्त हस्ताने उधळण केली आहे. राशीनुसार साधना करण्यासाठी मठात १२ देवदेवतांची मंदिरे आहेत. त्यातील पहिले शिवमंदिर असून शेजारी अनुक्रमे श्री गोरक्षनाथ, श्री गणेश, श्री हनुमान, श्री भैरवनाथ, श्री जगदंबा देवी, श्री गुरूदेव दत्त, श्री भगवान विष्णु, संतश्रेष्ठ तुकाराम महाराज, संत रामदास, संत ज्ञानेश्वर माऊली, संत एकनाथ महाराज अशी मंदिरे आहेत. ही सर्व मंदिरे मठाच्या दक्षिणेस असून मठाच्या उत्तरेला धर्मशाळा आहे. मठाच्या पूर्वेला तपश्चर्याकरिता गुहा आहे. त्यावर राधाकृष्णाचे मंदिर आहे. मंदिराच्या उत्तरेस गाईचा गोठा आहे. गुहेच्या शेजारी ग्रंथालय आहे. प्रवेशव्दाराला शेजारीच उत्तर दिशेला श्री बाबांचे निवासस्थान असून त्याच्यालगत स्वयंपाकघर आहे.

## अंजनीमाता मंदिर :-

पुण्यापासून वीसएक किलोमीटर अंतरावर असलेले अंजनीमातेचे मंदिर म्हणजे एका दिवसाच्या सहलीसाठी उत्तम ठिकाण. डोंगरदऱ्या, वृक्षराजी अशा निसर्गसंपत्तीने नटलेले असल्याने इथे आल्यावर मनाची मरगळ नक्की दूर होते. अंजनीमातेचे मंदिर पुण्याहून रेल्वेने मुंबईकडे जाताना वाटेत कान्हे नावाचे स्टेशन लागते. तिथून सुमारे 22 किलोमीटर अंतरावर (टाकवे बु. च्या पुढे 7-8 कि. मी. ) नागाथली-कुसवली गावांजवळ अंजनी मातेचे मंदिर आहे.

## श्री पांडेश्वर मंदिर :-

जेजुरी- मोरगाव परिसरातील मुद्दाम भेट देण्याजोगे एक ठिकाण म्हणजे जेजुरीपासून दहा किलोमीटरवरील श्री पांडेश्वर. मोरगावकडे जाणाऱ्या एसटी बस इथे येण्यासाठी उपयुक्त ठरतात. कऱ्हा नदीच्या काठी हे मंदिर आहे. या मंदिराची बांधणी खूप मोठ्या विटांनी केलेली आहे. त्यावर जाड गिलाव्याचा थर आहे. सातवाहनकालीन विटांप्रमाणे या विटा वाटतात. मात्र देवळासमोरचा दगडी मुखमंडप नंतरचा असला तरी तोही सात-आठशे वर्षांपूर्वीचा असावा. या मुखमंडपात २४ देवकोष्टे (कोनाडे) आहेत. त्यातील मूर्ती मात्र गायब आहेत. मंदिराच्या गाभाऱ्यासमोर गजपृष्ठाकृती सभामंडप आहे. या सभामंडपाच्या भिंती आणि छत यावर भौमितिक रंगीत नक्षी असून त्यातच काही चित्रे व लेख आहेत. मात्र हे सारे फारच पुसट झाले आहे. भारत इतिहास संशोधक मंडळातील डॉ. गणेश गंगाधर मुजुमदार आणि डॉ. कमल चव्हाण यांनी १९७२-

७३ च्या सुमारास या भित्तिचित्रांचा अभ्यास केला होता. अतिशय दुर्मीळ अशा या पुरातन भित्तीचित्रांचा निगुतीने सांभाळ करण्याची नितांत आवश्यकता आहे. महाभारत, रामायण, कृष्णलीला, शिवलीला, दशावतार हे चित्रविषय तर त्यात आहेतच. पण काही युद्धदृश्ये, शिकारीला निघालेला राजपुरुष, दोन राजपुरुषांची भेट, नृत्यसभा, प्रेमीयुगुल यांचीही चित्रे त्यात आहेत. हत्ती, घोडे, हरीण, उंट, कुत्रा, गाय, असे प्राणी, मोर, पोपट आदी पक्षी यांचेही चित्रण त्यात आहे.

## सिंहगड :-

पुण्यापासून अंदाजे ३०-३५ कि. मी. अंतरावर असणारा हा किल्ला नावाप्रमाणेच भक्कम आहे. तानाजी मालुसरे यांच्या सिंहासारख्या कामगिरीमुळे मूळच्या कोंडाणा किल्ल्याचे नाव 'सिंहगड' झाले. गडावरील देव टाके थंड आणि गोड पाण्यासाठी प्रसिद्ध आहे. गडावर राजाराम महाराज यांची समाधी आणि तानाजी मालुसरे यांचे स्मारक आहे. शिवाय मुंबई-दूरदर्शनचा मनोरा, लो. टिळक आणि ग. दि माडगुळकर यांचे बंगलेसुध्दा आहेत.

## भुलेश्वर

पुण्यापासून अंदाजे ५० कि. मी. वर भुलेश्वर हे देवस्थान आहे. हे बहुधा पांडवकालीन असावे. मूर्तिकाम पाहण्यासारखे आहे. लढायांच्या धामधुमीत बर्यायाच मूर्तींची तोडफोड झालेली दिसते. गणपतीची स्त्री रूपातील भारतातील कदाचित एकुलती मूर्ती या मंदिरात आहे. गाभार्यात शिवलिंग आहे. मात्र फक्त पूजेसाठीच ते पिंडीवर ठेवण्यात येते. [लढाईचाच परिणाम] पिंडीवरील खोलगट भागात मिठाई किंवा पेढा ठेवल्यास तो खाल्ल्याचा आवाज ऐकू येतो. मंदिराच्या आत छायाचित्रणास बंदी आहे.

## दौलतमंगळ किल्ला-

पुणे - सोलापुर मार्गावरील यवत गावा जवळ असणारा दौलतमंगळ किल्ला आज नामशेष होण्याच्या मार्गावर आहे. सध्याच्या काळात दौलतमंगळ किल्ला म्हणुन फ़ारसा प्रसिध्द नाही. पण त्या टेकडीवर असलेल हेमाडपंथी भुलेश्वर मंदिर मात्र प्रसिध्द आहे. हे मंदिर असलेल्या टेकडी भोवती तटबंदी, बुरुज

बांधुन शहाजीराजांच्या काळात दौलतमंगळ किल्लाची उभारणी करण्यात आली. किल्ल्याच्या दक्षिणेस असलेल्या मंगळाई देवीच्या ठाण्यावरुन या किल्ल्याला "दौलतमंगळ गड" हे नाव पडले असावे. पुणे सोलापूर महामार्गा वरून ( पुणे - हडपसर- उरळी कांचन ) साधारणपणे ४५ किलोमीटर गेल्यावर यवत गाव लागते. यवत गावात पोहोचल्यावर यवत पोलिस चौकीच्या अलीकडील उजव्या बाजुच्या रस्त्याने दौलतमंगळ गडावर उर्फ भुलेश्वर मंदिरात पोहोचता येते. यवत गावापासून भुलेश्वर मंदिर १० किलोमीटर अंतरावर आहे






## कार्ला लेणी

पुण्यापासून अंदाजे ४० किलोमीटरवर वर कार्ल्याची प्रसिध्द लेणी आहेत. ही लेणी ख्रिस्तपूर्व दुसर्या शतकातील आहेत. ही बौद्ध लेणी म्हणजे स्थापत्यशास्त्राचे एक अप्रतिम उदाहरण आहे. तेथेच एकविरा देवीचे मंदिरही आहे. देवीची मूर्ती अतिशय कोरीव असून डोळे अगदी जिवंत वाटतात.

## भाजा लेणी

कार्ल्याच्या अगदी विरुद्ध दिशेला लोहमार्गाच्या पलीकडे ही भाजा लेणी आहेत.

## बेडसा लेणी

कार्ल्याच्या दक्षिणेस अंदाजे १० कि. मी. अंतरावर, कामशेत रेल्वे स्टेशनजवळ, बेडसे हे छोटे गाव आहे. तेथील लेणी आकाराने छोटी आहेत मात्र आकर्षक आहेत.

## तुळापूर

पुण्यापासून अगदी, ३५ - ४० किमी. (?) अंतर असेल. अहमदनगर रस्त्यावर, वाघोली नंतर एक फाटा डाव्या हाताला वळतो. काही अंतरावरच तुळापूर आहे. अगदी निसर्गरम्य ठिकाण आहे. श्री. संभाजी महाराजांची समाधी आणि सुमारे १२०० वर्षांचे जुने शिवमंदिर बघण्यासारखे आहे. शिवाय, नावेतून फिरतासुद्धा येते. ३ नद्यांचा संगम आहे.

Tushar Pohnekar

## भंडारा डोंगर

चाकण पासून उजव्या बाजूला जाणारा रस्ता भंडारा डोंगराला जातो. . महान संत तुकाराम यांनी आपले लिखाण याच ठिकाणी केले. . सोबत तुकाराम मंदिर - गाथा मंदिर असे बरेच काही पाहण्यासारखे आहे.

## कानिफनाथ मंदिर

पुण्यापासून अंदाजे १ तासाच्या अंतरावर श्री कानिफनाथ मंदिर आहे. मुख्य समाधिठिकाण अहमदनगर जिल्ह्यात आहे. बापदेव घाट पार करुन वरती मंदिरापर्यंत जाता येते. रविवारी सकाळी आरती व प्रसाद वाटप होते. मंदिराच्या गाभार्यायामध्ये फक्त पुरुषांनाच अंगरखा/सदरा उतरवून अंदाजे २/२ मापाच्या खिडकीतून आतमध्ये प्रवेश करावा येतो.

## महादजी शिंदे यांची छत्री

वानवडीमध्ये महादजी शिंदे याची ही राजवाडावजा इमारत आजही मोठ्या डोलात उभी आहे. मंदिराच्या बांधकामामध्ये राजस्थानी कला दिसून येते. रविवार वजा(?) आठवडाभर येथे भेट देता येते. मंदिराच्या आतमध्ये शिंदे घराण्याच्या आजपर्यंतच्या पिढ्यांची छायाचित्रे पहायला मिळतात.

## 'निसर्गरम्य बनेश्वर व तेथील शिवालय' (पुणे) :-

हिरवे निसर्गसौंदर्य अनुभवण्यासाठी डोंगरकुशीतील एखाद्या शांत शिवालयाच्या शोधात असाल तर, पुण्याजवळच्या बनेश्वरला जा. डोंगरटेकड्यांनी वेढलेल्या गर्द वृक्षराजीत, पुण्याजवळील नसरापूर गावाजवळ हे शिवालय वसले आहे. एक दिवसाच्या कुटंुब सहलीसोबतच टेकर्ससाठीही हे ठिकाण सोयीचे आहे. बनेश्वर पुण्यापासून दक्षिणेला सातारा हायवेवर सुमारे ३५ किलोमीटरवर आहे. मंदिराभोवती दाट बन, म्हणजेच जंगलझाडी आहे. त्यामुळेच या शिवालयाला 'बनेश्वर' नाव मिळाले आहे. १७व्या शतकात पहिल्या बाजीरावाने हे दगडी शिवमंदिर उभारले. निसर्गसौंदर्याचे वरदान लाभल्यामुळे, शिवभक्तांसोबतच पर्यटकही बनेश्वरकडे आकर्षित होऊ लागले आहेत.

मंदिराचे प्रवेशद्वार, तसेच आवारातील दिपमाळ, मोठी घंटा व स्वच्छ पाण्याची कुंडे लक्षवेधक आहेत. मंदिरातील श्री विष्णू, लक्ष्मी तसेच महादेवाच्या मूतीर् उत्तम शिल्पकृती पाहिल्याचे समाधान देतात. मंदिराच्या आवारात धर्मशाळा तसेच पायऱ्या असणारे स्वच्छ पाण्याचे खोल दगडी तळे आहे. खोलगट गाभाऱ्यात पाच शिवलिंगे आहेत.

मंदिर परिसरात विकसित केलेली बाग तसेच मंदिरामागील सुंदर धबधबा पर्यटकांचे आकर्षण आहे. खोल नदीत असणारा हा धबधबा पाहण्यासाठी लोखंडी मचाणही उभारलेले आहे. पाऊलवाटेने धबधब्याजवळही जाता येते. मात्र सुरक्षेची व्यवस्था नसल्याने हा धबधबा दुरूनच न्याहाळे योग्य. नदीच्या कडेला डुलणारी उसाची शेते, स्वच्छ पाण्याने खळाळणाऱ्या नदीकाठी चरणारी गुरे, विविध जातींचे पक्षी यांचे निवांत निरिक्षण करणे एक आनंदानुभवच. टेकर्सलाही हे ठिकाण सोयीचे आहे कारण, या ठिकाणापासून छत्रपती शिवाजीमहाराजांचा राजगड ५० तर तोरणा किल्ला ३५ किलोमीटरवर आहे.






कसं जाणार?

पुणे शहरातील स्वारगेट बसस्थानकावरून वेल्हा गावाला जाणाऱ्या एसटी गाड्या नसरापूर फाट्यावर थांबतात. तसेच साताऱ्याकडे जाणाऱ्या अनेक गाड्याही या ठिकाणी थांबतात. तेथून बनेश्वरापर्यंत जाण्यासाठी सहा आसनी रिक्षा तसेच खासगी जीपगाड्या मिळतात. निसर्गसौंदर्य न्याहाळत फाट्यावरून मंदिरापर्यंत चालतही जाता येईल. फाट्यावरून मंदिर तीन किलोमीटरवर आहे. तर नसरापूर गावापासून अडीच किलोमीटरवर आहे.




## सुब्रमण्य स्वामींचे अयप्पा मंदिर / मुरुगन हिल मंदिर

हे मंदिर देहू रोड शंकरवाडी येथे एका लहान टेकडी वर आहे. प्रभु अयप्पा मंदिर देहू रस्ता, इंद्रावती नदीच्या किनाऱ्यावर येथे स्थित आहे. गाथा मंदिरपासुन हे जवळच आहे. मुं बई – पुणे जुन्या हायवेपासुन उजव्या बाजुला हे मंदिर आहे. १६ डिसेंबर पासून ते १५ जानेवारी, मंडल सण कालावधी, अयप्पा भाविक या मंदिरात दर्शनासाठी गर्दी करतात. आर्मी आसपासच्या प्रदेशात असल्याने, फोटोग्राफीला या क्षेत्रात

परवानगी नाही. आपण आधी कधीच अयप्पा मंदिरात गेला नसेल, तर या विधी आणि गोष्टी मल्याळम शैलीत कशा केले जातात हे पाहण्याचा एक अनुभव मिळेल.




## घोरवडेश्वर:

चिंचवडकरांना जवळ असलेली अन 'जवळची वाटणारी' ठिकाणं म्हणजे - दुर्गा टेकडी आणि घोरवडेश्वरची कातळकोरीव लेणी!!! घोरवडेश्वरला जाण्यासाठी पुणे-लोणावळे लोहमार्गावरील बेगडेवाडी (शेलारवाडी) स्थानकापाशी उतरायचं, किंवा पुणे-मुंबई जुन्या महामार्गावर सोमाटणे फाट्याच्या टोलनाक्याच्या अलिकडे दोनेक कि. मी. वर घोरवडेश्वरचा पायथा गाठायचा. 'गारोडी', 'गरोडी' किंवा 'शेलारवाडी लेणी' या नावाने देखील ओळखला जाणारा हा डोंगर. दक्षिणेला पायथ्यापासून १५० मी. (५०० फूट) उठावलेल्या डोंगरमाथ्यावर झेंडा फडकताना दिसतो. डावीकडे उंच टेपाड अन उजवीकडे जरा बुटकं टेपाड अश्या जोडशिखरांचा हा डोंगर म्हणजेच आपलं गन्तव्य.

माथ्यावर पोहोचायला आपापल्या आवडीनुसार २-३ वाटा आहेत. काहींना कमानीतून द्वारपाल नंदीमहाराजांच्या आज्ञेने चढणारा पायर्यांचा सोपान रुचतो. तर काहींना थेट खिंडीचा रोख धरून पाऊलवाट तुडवायला आवडतं. गिर्यारोहकांच्या सरावाचे कातळ अन अर्धवट खोदलेल्या पाण्याच्या

टाक्याच्या बाजूनं झाडीतून उभी वाट चढते. तर बहुतेकांना अमरजाईच्या देवळाअलीकडची धोपट वाट बरी वाटते. निसर्गमित्र संस्थेच्या प्रयत्नामुळे थोडकी झाडं जगली आहेत. जमलं तर माथ्याजवळच्या झाडांसाठी पाण्याचा एखाद कॅन घेऊन चढू लागायचं. खुणेच्या पिंप्रीच्या झाडाजवळून वीस-पंचवीस मिनिटांत आपण माथा गाठतो.

प्राचीन घाटवाट-दुर्ग-लेणी अश्या पाऊलखुणा शोधताना.

हा डोंगर श्री घोरवडेश्वराच्या देवस्थानामुळे सुपरिचित असला, तरी ही मुळात हिनयान बौद्ध लेणी (म्हणजे मूर्तीपूजेऐवजी बुद्धाची चिन्हरूपाने पूजा करणा-यांची) आहेत. नालासोपारा सारख्या प्राचीन बंदराकडून कोकणपट्टी पार करून पांथस्थ कोंडाणे लेण्यात विश्रांती घेत असतील. द्वारपाल राजमाची किल्ल्याच्या परवानगीनं कोकण दरवाजा किंवा बोरघाटाने घाटमाथा गाठून कार्ले-भाजे-बेडसे अश्या निसर्गरम्य लेण्यात मुक्काम करत असतील. लोहगड-विसापूर-तुंग-तिकोना अश्या दुर्गाचं संरक्षण असल्याने व्यापार अन धर्मप्रचारात अडथळा येत नसेल. पुण्याच्या दिशेनं प्रवास करताना घोरवडेश्वर-भंडारा-भामचंद्र अशी बौद्ध लेणी दिमतीला असतील. . प्राचीन काळच्या व्यापारी वाटा, त्यांच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी तैनात दुर्ग आणि पांथस्थांच्या विश्रांतीसाठी अन धर्मप्रचारासाठी खोदलेली कातळकोरीव लेणी अश्या नेहमीच्या 'घाटवाट-दुर्ग-लेणी' जोड्या शोधताना मजा वाटते.

हीनयान बौद्ध लेण्यांचं वैभव.

खिंडीच्या पूर्वेला (डावीकडे) वळल्यावर दोन विहार आहेत. • कातळात कोरलेल्या विठ्ठल-रखुमाईंच्या मूर्ती आपण ओळखतो. पायापाशी नव्याने ठेवली आहे तुकोबारायांच्या सुबक मूर्ती





खिंडीतून पश्चिमेला (उजवीकडे) गेल्यावर कातळात थोड्या उंचावर दोन विहार अन कोरीव कोनाडे दिसतात. पाण्याच्या पोढी (टाके) पासून आपण येतो मुख्य चैत्यगृहापाशी पोहोचतो. लेण्यांचा दर्शनी भाग कोसळल्यामुळे, बाहेरून जाड भिंत बांधली आहे. 'श्री घोरवडेश्वरा'च्या अंधार्या देवालयात (शैलगृहात) आता वीज आली आहे. इथलं देवस्थान जागृत मानतात. महाशिवरात्रीच्या उत्सवास खूपच गर्दी असते.




असे हे अप्रतिम ठिकाण ‘लेणे’ म्हणून अपरिचित आहे. येणारे लोक ‘श्री घोरवडेश्वरा’चे दर्शन घेतात, पण लेणी मात्र दुर्लक्षित करतात. पुणे परिसरात चतु:शृंगी डोंगर, पाताळेश्वर, भंडारा डोंगर, येरवडा (गांधी स्मारक) येथील साधी शैलगृहे अभ्यासकांसोबत पर्यटकांनीही पाहिली पाहिजेत. कार्ले, भाजे, बेडसे या लेण्यांप्रमाणे येथे उत्तुंग कृती नसेल कदाचित. पण प्राचीन अन् प्रेक्षणीय म्हणून या लेण्यांचे महत्त्व कुठेच कमी नाही.

## राजीव गांधी वन्य प्राणीसंग्रहालय व वन्य प्राणी संशोधन केंद्र :

राजीव गांधी वन्य प्राणीसंग्रहालय व वन्य प्राणी संशोधन केंद्र या नावांनी ओळखले जाणारे कात्रज येथील प्राणी संग्रहालय देशभरात प्रसिद्ध आहे ते येथील सर्प उद्याना मुळे, स्वारगेट पासून अवघ्या ७ किलोमिटर वर कात्रज येथे असल्या मुळे राजीव गांधी वन्य प्राणीसंग्रहालय हे कात्रज सर्पोद्यान म्हणून ओळखले जाते .

नव्वदच्या दशकात, ज्याकाळात 'साप' हा शब्द पण संध्याकाळी उच्चारला तर लोकं भूतबाधा झाल्यासारखे बघायचे, अश्या कठीण परीस्थित 'अण्णा'(निलीमकुमार खैरे) आणि राजाभाऊ ( राजन शिर्के) यांनी पुण्याच्या बाहेर कात्रज मध्ये ( तेंव्हा कात्रज खरोखर पुण्याच्या वस्तीच्या बाहेर होते, ) सर्पोद्यान काढले. निसर्गातील सरपटणारे प्राणी: साप, सरडे, घोरपड इ. ( खूप लोकांच्या भाषेत ई किळसवाणे प्राणी )आणि वन्यप्राणी यांच्याबद्दल लोकांमध्ये जनजागृती करणे हा त्यांचा निखळ हेतू होता. परंतु आता सापांबद्दल आकर्षण असणाऱ्या लोकांसाठी तर हि एक पर्वणीच आहे.

पुणे सातारा रोड, भारती विद्यापीठा जवळ, कात्रज , पुणे महाराष्ट्र -४११०४६

दूरध्वनी : ०२०-२४३७०७४७










## गुरुद्वारा गुरु नानक दरबार

लुल्ला नगर , पुणे , महाराष्ट्र ४११०४०

ब्रिटीशांच्या काळात येथील हाल हा करमणुक केंद्र म्हणुन वापरले जात असे. नंतर शिखांच्या विनंतीवरुन हे पुजेसाठी वापरले जाऊ लागले. गुरुपौर्णिमा आणि बैसाखीला इथे मोठ्या संख्येने लोक जमा होतात. उत्सवाच्या काळात इथे फुलांची सजावट केली जाते.






## तुकाई मंदिर, बाणेर

## शांतता बुरुज / शांतता टॉवर



हे एक पर्यटन स्थळ नाही पण पारशी लोकांची दफन भुमी आहे. शांतता टॉवर येथे पारशी लोक मृत शरीरे गिधाडे किंवा इतर पक्षी यांना खाण्यासाठी ठेवतात. त्यांना गिधाडाने खाल्ले असता त्या म्रुत आत्म्याला शांती लाभते असे मानतात. हे बाहेरील लोकांसाठी बंद असते. फक्त पारशी लोकांना तिथे प्रवेश दिला जातो. त्यामुळे लोक हे ठिकाण बघायला उत्सुक असतात. आणि ही जागा एक झपाटलेली जागा असल्याचे सांगतात.

Popularly known as Red Temple or Lal Deval, Ohel David Synagogue in Pune boasts of an interesting blend of architectural wonder and divinity. You can’t help but admire the design and the interesting use of colours- it has been built in neo-Gothic style with red brick and stone and has a unique feel attached to it. History tells us that the place was built by Late David Sassoon in the year 1863. Mainly dedicated to the Jewish Community, the Synagogue is a popular tourist attraction in the city.

-- Read more: https://www. ixigo. com/ohel-david-synagogue-pune-india-ne-1700233

## ओहेल डेव्हिड सिनेगॉग / लाल मंदिर

लोकप्रिय वास्तू आश्चर्य आणि देव एक मनोरंजक मिश्रण पुणे आघाडीवर आहे Red मंदिर किंवा लाल देवल , ओहेल डेव्हिड सिनेगॉग म्हणून ओळखले जाते. आपण मदत पण रचना आणि लाल वीट आणि दगड

निओ-गॉथिक शैली मध्ये बांधले आणि तो संलग्न एक अद्वितीय अनुभव आहे गेले आहे colours- मनोरंजक वापर प्रशंसा करू शकत नाही. इतिहास ठिकाणी वर्षी ज्यू समुदाय मुख्यतः समर्पित 1863. मध्ये कै डेव्हिड ससून बांधले होते की आपल्याला सांगतो की, यहूदी लोकांच्या सभास्थानात शहरात एक लोकप्रिय पर्यटन आकर्षण आहे.

पुणे - कोरेगाव पार्क येथील लष्कर भागातील आंबेडकर रस्त्यावर असलेले "ओहेल डेव्हिड सिनेगॉग' (लाल देऊळ) म्हणजेच ज्यू धर्मीयांचे सांस्कृतिक, धार्मिक व सामाजिक केंद्र आहे. पुणे व परिसरामध्ये सुमारे दीडशे ज्यू नागरिक वास्तव्यास आहेत. त्यांच्या प्रार्थनेसाठी विशेषतः शनिवारी, इतर सांस्कृतिक कार्यक्रम तसेच सामाजिक गरजा पूर्ण करण्यासाठी सिनेगॉगमध्ये कार्यक्रम घेण्यात येतात. ससून सर्वोपचार रुग्णालयाची स्थापना करणाऱ्या आणि "इराकी ज्यू' असलेल्या स्वर्गीय डेव्हिड ससून यांनी १८६३मध्ये सिनेगॉग बांधणीस सुरवात केली. लाल विटांचे बांधकाम असल्याने या वास्तूला तेव्हापासून "लाल देऊळ' असे संबोधले जाऊ लागले. १९९१ मध्ये आखाती युद्धाचे पडसाद पुण्यातही उमटले होते व येथील "सिनेगॉग'मध्ये आग लावण्यात आली होती.

सिनेगॉगच्या आवारात कोणत्याही प्रकारच्या वाहनांच्या पार्किंगला बंदी घालण्यात आली आहे. सिनेगॉगमध्ये प्रार्थनेसाठी येणाऱ्या किंवा पर्यटक म्हणून येणाऱ्या कोणत्याही व्यक्तीची चौकशी सीमाभिंतीनजीक बंकरमध्ये चोवीस तास तैनात करण्यात आलेल्या राज्य राखीव पोलिस दलाच्या कर्मचाऱ्यांकडून केली जाते. ज्यू धर्मीयांनादेखील येथे थेट प्रवेश नाही. सिनेगॉगच्या व्यवस्थापनाकडून ज्यू नागरिकाची ओळख पटल्यानंतरच संबंधित व्यक्तीला आवारात प्रवेश दिला जातो. त्यासाठी त्याचे पारपत्र किंवा राष्ट्रीयत्वाचा अन्य पुरावा तपासला जातो.

ओहेल डेव्हिड सिनेगॉग

डॉ आंबेडकर रोड मोलेदिना रोड (नेहरू मेमोरियल हॉल च्या समोर ), गावलीवाडा कॅम्प , पुणे, महाराष्ट्र ४११००१

फोन नं- + ९१-२०-२६१३२०४८

## पुण्यातील उंच गणपती पुतळा, तळेगाव

हा गणपती ५४ फूट उंच व १८ फुट उंच प्लॅटफॉर्मवर आहे , त्यामुळे त्याची संपुर्ण उंची ७२ फुट झाली आहे. या मुर्तीला तांब्याचा लेप दिलेला आहे. ही मुर्ती बनवायला मुर्तीकारांना दोन वर्षे लागली. बसंत कुमार बिर्ला आणि सरला बिर्ला  यांच्या हस्ते १७ जानेवारी २००९ रोजी उद्घाटन करण्यात आले. वरती जायला अंदाजे १८० पायर्या आहेत. मंदिर रात्री ८ वाजेपर्यत उघडे असते. खाली पैसे देऊन पार्किंगची व्यवस्था केलेली आहे. शिवाजीनगर ते शिरगाव  वरुन ३० कि. मी. वर ४ एन एच – ४ लोणावळयाच्या दिशेने आहे. ( द्रुतगती मार्ग घेऊ नका.)





Pune Gourmet Club पुण्यात 2007 पासून पुणे वाइन फेस्टीव्हल आयोजीत करते. पुण्याबरोबर मुंबईला बांद्र्यालाही हा वाइन फेस्टीव्हल ते आयोजीत करतात. अस्सल वाइनप्रेमींसाठी वेगवेगळया वाइनरीजच्या वाइन्स चाखण्याची आणि विकत घेण्याची, एकाच ठिकाणी, एक मस्त संधी ह्या निमीत्ताने प्राप्त होते.



## ई साहित्य प्रतिष्ठान

मराठी पुस्तक वाचायला कुठे जायची गरज नाही. तुमच्या मोबाईलवर आता हजार मराठी ई पुस्तके आहेत.

मराठी ई पुस्तकं तुम्ही www. esahity. com वरून डाऊनलोड करा. किंवा esahity@gmail. com ला कळवून मेल ने मिळवा. किंवा 7710980841 हा नंबर सेव्ह करून या नंबर ला तुमचे नांव व गांव Whatsapp करून पुस्तके whatsapp मार्गे मिळवा. किंवा ई साहित्यचे app. https://play. google. com/store/apps/details?id=com. esahity. www. esahitybooks या लिंकवर उपलब्ध आहे. ते download करा. हे सर्व मोफ़त आहे. No terms. No Conditions.

आता ठरवलंय. मराठी पुस्तकांनी अवघं विश्व व्यापून टाकू. प्रत्येक मराठी सुशिक्षिताच्या मोबाईलमध्ये किमान पन्नास मराठी पुस्तकं असलीच पाहिजेत. प्रत्येक मराठी माणसाच्या!

तुमची साथ असेल तर सहज शक्य आहे हे... कृपया जास्तीत जास्त लोकांना यात सामिल करून घ्या.

आपले नम्र

